(एक सामाजिक नाटक.)

श्रीयुत बाबू अमृतलाल बोस यांच्या
मूळ बंगाली पुस्तकावरून

बापु नरसिंह भावे

यांनीं
मराठींत भाषांतर केलें



तें
मुंबई येथें,
जावजी दादाजी यांच्या "निर्णयसागर"
छापखान्यांत छापिलें.

---

सन १९०० इसवी.

---



---

किंमत १० आणे.

# अर्पणपत्रिका.



आज सतत तीस वर्षें गंभीर,
सारभूत आणि मार्मिक लेख लिहून
ज्यानें मराठी सारस्वताची एकनिष्ठ प्रेमानें
सेवा केली त्या महाराष्ट्रवाङ्मयास ललामभूत
होऊन राहिलेल्या

**विविधज्ञानविस्तार मासिकपुस्तकास**

कृतज्ञतेची खूण ह्मणून
ही अल्पकृति आदरपूर्वक
अर्पण करीत आहे.

**भाषांतरकर्ता.**



# प्रस्तावना.

प्रस्तुत पुस्तक हें प्रसिद्ध वंगनाट्यकार श्रीयुत बाबू अमृतलाल बोस यांच्या एका नाटकाचें भाषांतर आहे. हें सामाजिक विषयावर लिहिलेलें असून यांत हिंदु स्त्रियांच्या पतिनिष्ठेचें सुंदर चित्र काढलें आहे. इंग्रजी प्रीतिविषयक कादंबऱ्यांच्या वाचनानें अलीकडील तरुण मंडळीपैकीं कांहीं वेडेपीर काल्पनिक प्रणयाच्या नादीं लागून कसे भ्रहकतात व कपटपटु वारयोषितांच्या मोहजालांत सांपडून आपलें जगांत कसें हसें करून घेतात हेंही यांत उत्तम रीतीनें दर्शविलें आहे. त्याप्रमाणेंच ऐन तारुण्याच्या भरांत प्रियपतीचा चिरवियोग झाला असतांही हिंदु विधवा दगलबाज आणि कामांध लोकांच्या थापांस न भुलून आपला वर्तनक्रम किती चोख ठेवितात याचें यांत फार मनोहर वर्णन आहे. स्वतःला काडीचाही फायदा नसतांना केवळ अकारण स्नेहानें कांहीं सज्जन लोक या जगांत कशी सहानुभूति दाखवितात हें या पुस्तकावरून चांगलें शिकण्यासारखें आहे. सारांश तरुबालेची पतिनिष्ठा, शांतेचें शुद्ध आचरण, व मृत्युंजय आणि आमोदिनी या रंगेल जोडप्याचें अकारण सौहार्द हीं जितकीं अनुकरणीय आहेत तितकींच अखिलाचें अज्ञान व वेणीदादाचे कपटप्रबंध हीं अनुकंपनीय व गर्ह्य होत. सदर्हु पुस्तक वाचल्यानें आमच्या तरुण मंडळीच्या मनावर

कविमित्राचे, व छपाईचें काम नियमित वेळीं सुंदर करून दिल्याबद्दल निर्णयसागर छापखान्याचे मालक रा. रा. तुकाराम जावजी शेट, जे. पी. यांचे मनापासून आभार मानून हा प्रस्तावनालेख पुरा करितों.

प्रयागराज, चैत्र
शु० १ शके १८२२

**वा. न. भावे.**



| | |
|---|---|
| **हिरालाल.... ... ... ...** | वेणीमाधवाचा साथी. |
| **शोभनलाल. ... ... ...** | मथुरेचा चोबे. |

मधुसिंह, दोन भिकारी व पहारेवाला वगैरे.

## स्त्रीपात्रें.

| | |
|---|---|
| **प्रसन्नमयी. ... ... ...** | अखिलचंद्राची आई. |
| **आमोदिनी. ... ... ...** | मृत्युंजयाची तिसरी बायको. |
| **तरुबाला.** ( नायिका ) ... ... | अखिलाची बायको. |
| **शान्ता.** ( शान्तु )... ... ... | अखिलाची विधवा बहीण. |
| **दामिनी.... ... ... ...** | वेणीमाधवाची बायको. |
| **सहचरी.... ... ... ...** | एक गवळण. |
| **पारूल. ... ... ... ...** | इंग्रजी शिकलेली वारांगना. |
| **वामा. ... ... ... ...** | पारूलची आई. |
| **हेना } किस्मिस. } ... ... ...** | पारूलच्या ओळखीच्या वारांगना. |





**प्रसन्न०**—खरें ह्मणशील तर मला आपली काशीस पाठीव.

**अखिल०**—आई, तुझा माझ्यावर हा उगाच राग आहे.

**प्रसन्न०**—राग कसला बाबा. आतां मी किती दिवस दगदग करूं. तूं आतां मोठा झालास, तुला बरें वाईट कळूं लागलें, आतां आपला संसार कर, अखेरपर्यंत संसारांत पडून मग तीर्थयात्रा वगैरे आह्मीं केव्हां कराव्या ?

**अखिल०**—तूं गेल्यावर मग मी कोठें जाऊं ?

**प्रसन्न०**—खरें, खरें, तूं कांहीं आतां लहान मूल नाहींस, आया जन्माला का पुरतात ? माझें काम मीं केलें, तुझें लग्न करून दिलें, आतां आपला संसार कर. एक मूठभर अन्नाकरितां मला ही दगदग कशाला ?

**अखिल०**—आई, मला तुझी समजूत घालतां येत नाहीं. तिचें व माझें पटण्याची आशा नाहीं.





**अखिल०**—लाभ नव्हे, लभ्, लभ्, ज्याला प्रणय किंवा प्रेम ह्मणतात तें.

**प्रसन्न०**—बोलण्याचालण्यानें प्रणय होतो. तूंच तर सर्व बिघडविलेंस. ती कांहीं भांडखोर नाहीं. ती तर इतकी गरीब आहे कीं बोलायची सोय नाहीं.

**अखिल०**—सांगितलें तर तुला कळायचें नाहीं. बोलण्याचालण्यानें होणारा हा प्रणय नव्हे. तें कांहींएक निराळेंच तंत्र आहे.

**प्रसन्न०**—तें कांहीं असो, मला आपली काशीस पाठवून दे कशी ? माझाच एक मधें कांटा आहे. मी दूर असलें ह्मणजे तुमचें सर्व ठीक जुळेल.

**अखिल०**—आई, तूं रागावतेस त्याला माझा काय उपाय ? जेथें प्रणय नाहीं तेथें नुसता वरकांतीं आव आणणें मला आवडत नाहीं. मी जर दहा माड्या चढणारा असतों तर तुझें ह्मणणें बरोबर होतें. मी आपल्या दुःखांतच चूर आहें.

**प्रसन्न०**—तूच त्याचा विचार घे, शेजाऱ्यापाजाऱ्या वडील माणसांचा सल्ला घे, व जें योग्य वाटेल तें कर. माझी का त्याला ना आहे ?

**अखिल०**—मग मी का श्रम करण्याला राजी नाहीं? मला जें सांगशील तें मी करीन. परंतु जबरदस्तीनें केलेल्या लग्नापासून का खरी प्रीति मिळणार ?

**प्रसन्न०**—काम धंदा तर करूं लाग; मग पाहूं कशी प्रीति होत नाहीं ती. वेणीला एक वेळ मजकडे पाठवून दे.

**अखिल०**—बरें, पाठवीन. मी आतां जातों.

**प्रसन्न०**—शेजारच्या आजोबांनीं तुला कशाला बोलाविलें आहे तें एकदां ऐकून जा.

**अखिल०**—बरें. [जातो.]

**प्रसन्न०**—मी जर गेलें तर ह्याचा संसार कसा चालेल? माझेंच नशीब फुटकें नाहीं तर असा मुलगा व अशी सून असून माझ्या कपाळीं सुख कां नसावें! एखादें नातवंड

**शान्ता.**—आई, पूजा करून देवाचीं उपकरणीं वगैरे घांसून संध्याकाळची कामगिरी उरकून घेतली यामुळें थोडा उशीर झाला.

**प्रसन्न०**—उपकरणीं वगैरे घांसायला एखाद्या मोलकरणीला सांगितलें असतेंस तर ?

**शान्ता.**—देवाचें काम कोठें मोलकरणीकडून का होतें ? त्या का आपल्यासारखें काळजीनें कामें करतील ? कशी तरी एकदां बिगार टाळतात झालें.

**प्रसन्न०**—सूनबाईनें कांहीं खाल्लें का ?

**शान्ता.**—गवळणीनें दुधास आज उशीर केला, दूध चुलीवर ठेवलें आहे, तापलें ह्मणजे दूधभात खाईल. स्वयंपाकीणबाईचें तर केव्हांच आटोपलें आहे, व त्या संध्याकाळच्या कांहीं तजविजींत गुंतल्या आहेत.

**प्रसन्न०**—खाणें झाल्यावर दूध चुलीवर ठेवलें असतें

स्वयंपाक कव्हांचा झाला आहे. वेळीच दोन घांस खाल्ले ह्मणजे बरें.

**तरुबाला.**—उशीर कसला. आपण जे लाडू करून ठेवले आहेत त्यांतला एक लाडू आंगधुणें वगैरे आटोपून मीं खाल्ला.

**प्रसन्न०**—तुला योग्य दिसेल तें कर. मी आणखी किती दिवस ? आहें तोंपर्यंत सर्व शिकून संवरून घे.

**तरुबाला.**—आपण कोठें जाणार ?

**प्रसन्न०**—मी अमर का आहें ? दोन दिवस आहें तोंपर्यंत तीर्थयात्रा वगैरे करून कांहीं सार्थक नको का करायला ? आईबाप मग मुलांचीं लग्नें वगैरे करून देतात, तीं ह्याच करितां ना ? अखिलाला व तुला लहानाची मोठी केली. आतां तुह्मांला कळूं लागलें. आतां मला परवानगी द्या.

**शान्ता.**—तें दादाच्या हातीं, वहिनी काय करणार ?

**प्रसन्न०**—आह्मीं काय केलें ? आह्मी काय सुना न-





सबरल ह्मणून तर मला हल्ली सासूपणी आली आहे.

**शान्ता.**—माझ्या बाबासारखीं माणसें कोठलीं मिळायला? दादा तर वहिनीला वाऱ्यासही उभा राहूं देत नाहीं.

**प्रसन्न०**—पुरुष असे रागावतात ह्मणून बायकांनीं मरायचें का आहे? त्यांच्या पुढें पुढें करावें, थोडीं आर्जवें करावीं ह्मणजे आपोआपच त्यांचा राग जातो.

**शान्ता.**—वहिनी जात का नाहीं? पण दादा कसें करतो तें बघितलेंस का?

**तरुबाला.**—वन्सें, सासूबाईंना घेऊन लवकर या. चूल विझली देखील असेल. मी जाऊन पहातें. [जाते.

**शान्ता.**—आई, चल फार उशीर झाला.

**प्रसन्न०**—जशी मी अभागी तशीच सूनबाईची आईही आहे. माझ्या सुनेसारखें दुःखी कोणीही नाहीं.

**शान्ता.**—आई, ह्या गोष्टी कधींच संपायच्या नाहींत. चल लवकर व स्वयंपाकाला लाग.

**प्रसन्न०**—चल तर. जय हरी.

[दोघी जातात.

---

**अखिल०**—मला कशाला बोलावलें ?

**मृत्युं०**—कशाला बोलावलें हें बघ, तीन वेळ लग्न केलें, पोरबाळ कांहीं झालें नाहीं. आतां निश्चय केला आहे कीं पुन्हां ह्मणून लग्न करावयाचें नाहीं. तुझी बायको आतां चांगली न्हातीधुती झाली असून तूं तर तिजकडे ढुंकूनही बघत नाहींस. परती माझ्या का हवालीं करीनास ?

**अखिल०**—तुह्मींच तर लग्न करून दिलें, वाटेल तर घेऊन जा, माझी कांहीं हरकत नाहीं. माझा काय त्यांत संबंध ?

**मृत्युं०**—तुझी हरकत नाहीं हें मला ठाऊक आहे, परंतु घरांतून मला कळलें आहे कीं ती तुझ्या नांवानें रडून रडून मरते आहे.

**अखिल०**—थट्टा नव्हे, आईबरोबर आतां ह्याच गोष्टी चालल्या होत्या. तुह्मीं लग्न करून दिलें, तिनें खावें, प्यावें व घरांत रहावें; बस्स. ह्याहून जास्त कांहींएक संबंध नको.

**मृत्युं०**—त्याबद्दल माझें बोलणें नाहीं. पुन्हां पुन्हां मनांत

सवत कुठली खपायला. एक काम कर, एक चांगला तरणा बांड नोकर बायकोकरितां ठेव, त्याचा पगार मुकाट्यानें मी देईन. समजलें, आलें ध्यानांत ?

**अखिल०**—याचकरितां कां तुह्मीं मला बोलावलेंत? मी जातों.

**मृत्युं०**—अरे बैसरे, आह्मी ह्मातारे आपले मूर्ख. तुह्मी आजकालचीं नवीं माणसें इंग्रजी शिकलेलीं. बरें पण लग्नाच्या स्त्रीला सोडणें हें चांगलें का ?

**अखिल०**—कोणाचें लग्न ? कोणाची बायको ? स्वतांच्या पसंतीनें का मीं लग्न केलें ?

**मृत्युं०**—तुझें लग्न असें तसें नाहीं. तुझ्या बायकोच्या उपावणाचे पूर्वीच वाङ्निश्चय झाला होता. तुझे वडील व सासरे एकाचं कचेरींत नोकर होते. समजलें ? त्या वेळींच तुझ्या वडिलांनीं पार्वतीबाबूला सांगितलें होतें कीं जर तुह्मांला मुलगी झाली तर आमच्या मुलाशीं तिचें लग्न करावें. समजलें ? मरायचे वेळीं देखील तुझ्या बापानें मला सांगितलें कीं काका, माझ्या अखिलाचें लग्न पार्वतीबाबूच्या मुलीबरोबरच करा.

**अखिल०**—आजोबा, पहा हा केवढा अन्याय ! बाबा ह्मणाले होते ह्मणूनच न पहातां न संवरतां लग्न करावें ? जिच्या संगतींत जन्म घालवावयाचा तिची स्वतां पसंती केल्याशिवाय प्रीति कशी उत्पन्न होईल ?

**मृत्युं०**—कां होणार नाहीं ? आईबाप तर कोणी स्वतां

जमते ? तशीच स्त्री. समजलें ? प्रीति एकत्र राहिल्यानें जडते.

**अखिल०**—मी जी प्रीति ह्मणतों ती तुह्मांला कळावयाची नाहीं.

**मृत्युं०**—तुकतें कोठें एक लग्न झालें, अद्याप संसार वगैरे कांहीं झाला नाहीं तोंच तुला प्रेमाचें रहस्य कळलें; व मी तीन लग्नें करूनही मला समजत नाहीं. माझें पहिलें लग्न वडिलांनीं करून दिलें होतें. बायको काळीबेंद्री रासवटच होती. तिच्या संगतींत थोडे दिवस काढले. स्वरूपानें ती कशीही असो परंतु स्वयंपाक मात्र फार उत्तम करी यामुळें स्वरूप वगैरे सर्व विसरलों. पुढें ती मेल्यावर ह्मराणच्या बहिणीशीं लग्न केलें. तीही कांहीं स्वरूपानें अप्सरा नव्हती परंतु माझी सेवा करण्यांत मात्र दक्ष असे. यामुळें स्वरूपाकडे सहजच दुर्लक्ष झालें. तिच्या नंतर तुझ्या धाकट्या आजीची पाळी आली. तिला तर तूं नेहमीं पाहातोसच. माझी गोष्ट ऐक. फार नाहीं, फक्त तीन महिने तुह्मी एकत्र रहा. मग पाहीन तुला कसें बाहेर जावेंसें वाटतें तें ?

**अखिल०**—आजोबा, तें मात्र माझ्या हातून होणें नाहीं.

**मृत्युं०**—माझी गोष्ट ऐकें. संसार कर. तीन वेळ लग्न करून कांहीं पोरबाळ नाहीं, तुह्मी आह्मी एक जातीचे, शिवाय शेजारी. तुझ्याशिवाय माझ्या गणागोताचें दुसरें कोणी नाहीं. त्यांतून तुझा बाप मला काका मानी; व मला देखील तूं नातवासारखाच आहेस. तुमचें आमचें थोडेंसें नातेंही आहे. दत्तक घेण्याची माझी इच्छा नाहीं. तुझ्या

आहे.

**मृत्युं०**—हें वघ, दुर्दैवी पोर वेडें झालें आहे. कां हो शालक, तुमच्या वेडाचें कारण कोण?

**हाराण.**—तुह्मांला काय त्याचें? तुह्मांला थट्टा सुचते आहे. ज्यावर प्रसंग येतो त्यालाच समजतें.

**मृत्युं०**—विधीबरोबर तुझें भांडणबिंडण झालें कीं काय?

**हाराण.**—अरे राम, ती गोष्ट काढूं नका. ती तर इतकी खच्याळ आहे कीं शहाणा मनुष्य तिजकडे ढुंकून देखील पाहणार नाहीं.

**मृत्युं०**—मग या वेळीं कोणाची पाळी आहे?

**हाराण.**—अखिलदादा, कोणाजवळ बोलूं नकोस. या वेळीं बेश्या सहचरीनें माझा सर्वस्वीं नाश केला आहे. काखेंत दुधाचा हांडा घेऊन दूध घालीत फिरते, आणि मला वेड लावते.

च्यांत आहे? लग्न करून घेऊन एकीचाच गुलाम होऊन रा-हणें मला कोठें पसंत आहे?

**मृत्युं०**—चांडाळा, लग्न कर, लग्न कर, मी तुझें लग्न करून देतों.

(आमोदिनी येते.)

**आमो०**—तो देवडीवरील पाहरेवाला गेला त्याला जडावाच्या पाटल्यांचा निरोप सांगितला का?

**मृत्युं०**—सांगितला, सांगितला, समजलीस.

**अखिल०**—धाकटी आजी, मजकडे पाहिलेंस का?

**आमो०**—जा, मी नाहीं तुझ्याशीं बोलत. जो बायकोकडे जावयास भितो, तो का पुरुष?

**मृत्युं०**—अग, अखिलाला सांगितलें आहे कीं, मी दत्तक घेणार नाहीं, पण तूं त्याला चांगलें समजून सांग.

**आमो०**—ज्याला जें चांगलें वाटेल त्यानें तें करावें.





**हाराण.**—सहचरीची सर कोणालाही नाहीं.

**मृत्युं०**—हें बघ ए, कांहीं दिवस आपण बदलाबदली करूं.

**आमो०**—तसें झालें ह्मणजे तुह्मांला मात्र फांके पडतील.

**मृत्युं०**—वेड्या अखिलाला अशा चांगल्या बायकोची योग्यताच कोठें कळते आहे. आज समजेल, उद्यां समजेल, अशा आशेवर मी आहें. ह्मटलेंच आहे.

**"तारुण्यांधा, गृहस्त्री जरि नच तुजला आजही गोड वाटे ।**
**पश्चात्तापें पुढें तूं ढळढळ रडशी; वाक्य माझें न खोटें ।।"**

**अखिल०**—आजी, मजवर रागाऊं नकोस. जर माझ्या हातीं असतें तर मी तिच्यावर प्रेम केलें असतें.

**हाराण.**—हातीं नाहीं हें तर सांगितलेंच. नाहीं तर सहचरीकरितां मी कशाला वेडा झालों असतों ?

**आमो०**—चला आतां घरांत. उकाड्यामुळें झोंप येत नाहीं, ह्मणून तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवर बिछाना घातला



---

## तृतीयगर्भांक.

### वेणीदादाचें घर.

( वेणी येतो. )

**वेणी०**—होम्योपाथी ह्मणजे अगदी सोपी आहे. त्यांत शिकायचें काय आहे. बुकें पाहून पाहून सुद्धां चिकित्सा करतां येते. एकोनाईट, बेलाडोना, पल्सेटीला व नक्सव्हॉमिका या चार औषधांपैकीं कोणचें ना कोणचें तरी औषध सर्व रोगांवर आपलें लागू पडावयाचेंच परंतु एक डिस्पेन्सरी व एक गाडी असल्याशिवाय धंदा चांगला चालावयाचा

२







उपायानें शान्तेला आपलीशी केली पाहिजे. अन्यायाची व पापाची गोष्ट तर तिला बिलकूल खपावयाची नाहीं. तिची समजूत घालून जर पुनर्विवाहाला तिला राजी केली तर पैशाचा पैसा मिळून वर सुरेख बायकोही मिळेल. माझी सध्याची बायको तर बोलून बोलून काळजाला घरे पाडते. अखिलाचें वाटोळें केल्याशिवाय कांहीं व्हावयाचें नाहीं. त्या कामीं हिराची योजना केली आहे. पहावें काय होतें तें. एक डिस्पेन्सरी व एक गाडी पाहिजेच पाहिजे, घर तर सुरेख मिळालेंच आहे. त्याचें भाडें दिलें नाहीं ह्मणून मालकानें नोटीस देण्याची धमकी दिली आहे. थोडे पैसे मिळाल्यावर त्याचें दोन महिन्यांचें भाडें फेंकून दिलें ह्मणजे कांहीं दिवस तरी मागचा त्रास चुकेल.

पडद्यांत—वेणीबाबू, वेणीबाबू.

त्याला घेऊन गेलों.

**वेणी०**—कोठें?

**हिरा०**—पारूलच्या घरीं.

**वेणी०**—वेश्येचे घरीं? तें कसें?

**हिरा०**—पारूल ह्मणजे शाळेंतील पोरांना आपल्या जाळ्यांत ओढण्यांत पक्की अट्टल. ती एके दिवशीं संध्याकाळचे वेळीं मोकळे केंस विंचरीत गच्चींत खुर्चीवर बसली होती, ती सहज अखिलच्या दृष्टीस पडली. भीतीमुळें त्याला त्या वेळीं तिच्या घरांत शिरतां येईना. ह्मणून त्यानें आज मला बोलावणें पाठविलेंन्, आणि मीं त्याला तिकडे नेलें.

**वेणी०**—काय? अखिल गेला होता? वेश्येचें नांव ऐकतांच त्याच्या अंगाचा तर संताप होई.

**हिरा०**—मग मजा ती कसली? तो ह्मणाला ही वेश्या नव्हे. जी इंग्रजी शिकली, जी चांगलें समजते संवरते ती





'लव्ह' पाहिजे, मी प्रेमाचा भुकेला आहें.

**वेणी०**—हा तर त्याचा मोठा Weak point आहे.

**हिरा०**—अशा रीतीनें जर त्याचें जुळलें तर वाईट हेतु वगैरे सर्व विसरून जाईल.

**वेणी०**—आजची तुझी बातमी ऐकून मी फार खुष झालों आहें. अखिलचें मन तिकडे लागलेंच, तर त्याच्या आईकडून कोणच्या ना कोणच्या युक्तीनें पैसे काढून डिस्पे-न्सरी काढण्याचें जुळेल. डिस्पेन्सरी मात्र थाटदार पाहिजे.

**हिरा०**—मग माझें काय करणार?

**वेणी०**—डिस्पेन्सरी काढल्यावर तुझीही कांहीं सोय करीन. तुला कंपौंडरी करतां येईल कीं नाहीं?

**हिरा०**—पाहिल्या संवरल्यावर न यायला काय झालें? कांहीं असो, लवकर कांहीं तरी व्यवस्था करा म्हणजे झालें. मी आतां जातों. [जातो.]

A4

B4

रिया तापाच्या औषधाची विक्री नुकतीच बंद झाली आहे. मी एक फार्स लिहिला आहे. तो ज्याला ज्याला वाचून दाखविला आहे त्याच्या त्याच्या डोळ्यांतून टिपें पाडलीं आहेत. परंतु कोणत्याच नाटकाचा म्यानेजर त्याचा प्रयोग करण्याचें पत्करीत नाहीं. "**प्रणयप्रवेश**" नांवाचें एक पुस्तक लिहून तयार आहे. तें छापायचा उशीर, कीं विक्री झालीच समज. नाहीं झाली तर "**गुप्तप्रेम**" नांवाच्या कादंबरीच्या प्रती सडत पडल्या आहेत त्या बक्षिसादाखल देऊं. केवळ टपालहंशिलाबद्दल फक्त एक रुपया दहा आणे घेऊन फुकट पुस्तक देण्याची जाहिरात दिलीच आहे. आतां हां हां ह्मणतां विक्री. छापखान्याचीही व्यवस्था केली आहे, परंतु कागद कोठें उधार मिळत नाहींत. त्याला काय करूं?

**दामिनी.**—मला तें कांहीं समजत नाहीं. माझ्याच्यानें हें गाडें कांहीं लोटत नाहीं.





यची नाहीं.

[ पडद्यांतून अखिल–वेणीदादा आहेत का वर. ]

**वेणी॰**—कोण, अखिल, तूं का? वर ये. ( बायकोस ) त्याच्या समोर भांडण बिंडण कांहीं काढूं नकोस. नुसत्या प्रेमाच्या गोष्टी चालूं देत.

( अखिल येतो. )

**अखिल॰**—एक वेळ मी येऊन गेलों. घड्याळाचें जर तुझें काम झालें असेल तर दे बघूं.

**वेणी॰**—आंता घेऊन जा, पण घड्याळाचें—

**दामिनी.**—कांहो भाउजी, हें काय तुमचें लक्षण? तुह्मी बायकोला जवळ देखील येऊं देत नाहीं, ह्मणून ऐकतें.

**अखिल॰**—प्रणय नसेल तर ऐक्य कसें होईल?

**दामिनी.**—तुमचें हें पांडित्य राहूं द्या. लग्न करायचें व घरांत रहायचें नाहीं ही कोठली रीत?

**वेणी०**—पवित्र प्रणयांत व्यभिचार कसला ?

**अखिल०**—मनांत कांहीं कुभाव न ठेवतां एखाद्या स्त्रीशीं बोलण्यांत कांहीं दोष आहे का ?

**वेणी०**—काय आहे तें तर मला कळूं दे.

**अखिल०**—वेणीदादा, एका स्त्रीशीं माझें भाषण झालें आहे. ती वेश्या कुळांत जन्मली आहे हें खरें, परंतु वेश्येचे ढंग तिच्या अगीं बिलकुल नाहींत. माझ्या समोर तिनें (Gray's Fable) कविता पाठ ह्मटली. तूं एक दिवस माझ्या बरोबर चल न् तिला पहाच. मीं केलेल्या कविता पाहण्याचें तिच्या मनांत फार आहे. थोड्या बरोबरच घेऊन जाऊं.

**वेणी०**—हें बघ तूं आपल्याच सुखाची काळजी करतोस. तुझा माझा दुजाभाव नाहीं ह्मणूनच विचारितों कीं तूं शान्तेचें काय करणार ? केवळ सोळा वर्षांची पोरगी





काढलीस त्याबद्दल मला मोठी शरम वाटते.

**अखिल०**–( मनाशीं ) अहाहा काय मौज!

( दामिनी येते. )

**दामिनी.**—भाउजी, हे विडे घ्या.

**अखिल०**—आँ.

**दामिनी.**—कां घाबरलांसे? विडा घ्या.

**वेणी०**—प्रिये, त्या घड्याळाची हकीकत मी अखिल-दादाला सांगतों. दादा, सांगूं तुला काय झालें तें? सहज-गत्या त्याचें भिंग फुटलें ह्मणून एका घड्याळजीकडे दुरु-स्तीला दिलें. मागून असें कळलें कीं तो दुकानबिकान मोडून फरारी झाला. आतां लवकर मी तुला दुसरें विकतच घेऊन देईन.

**अखिल०**—गेलें तर गेलें. त्यांत काय आहे. मी आतां जातों. मी जाईन तेव्हां तूं येशील ना?

बाकीचे सर्व तुह्मीच गाड्या घोड्यांत व चैनींत उधळलेत. मी दुर्दैवी, अशांच्या पदरांत पडलें आहें कीं मला एक दिवस देखील सुखाचा जात नाहीं.

**वेणी०**—सुख होईल, सर्व कांहीं होईल. जरा दमानें घे ह्मणजे सर्व तजवीज करतों. एकदा होम्योपाथी सुरू झाली कीं पैसेच पैसे.

**दामिनी०**—तुमचें ह्मणणें मला कांहीं कळत नाहीं. जळ्ळया ब्रह्मदेवानें माझी अशाची गांठ घातली आहे कीं मी दुखांतच मरावें.

**वेणी०**—शीतला भव, शीतला भव; थोडी शांत हो.

**दामिनी०**—तुमचें मला एक अक्षर देखील ऐकायाला नको. देवानें सुखाचा एक दिवस देखील माझ्या वांट्यास दिला नाहीं.

(पडद्यांत) **मधु०**—वेणीबाबु आहेत का घरीं?





[illegible] मधू, [illegible]

(मधुसिह जातो.)

फूँ, फूँ, फूँ.

**दामिनी.**—मधूला लवकर घालवून द्या. मला माझा राग आवरत नाहीं.

(पाणी घेऊन **मधू** पुन्हा येतो.)

**वेणी०**—पाणी आणलेंस का? दे पाहूं. (दामिनीच्या डोळयास पाणी लावून) का रे **मधू**, कांहीं वसूल झाला का? दत्तकंपनीकडे गेला होतास का? कांहीं बरें वाटतें का?

**मधु०**—गेलों होतों. पुन्हां शुक्रवारचा वायदा केला आहे, आज मला रजा पाहिजे. बड्या बाजारांत माझ्या गांवचा एक मनुष्य आला आहे, त्याला भेटायला गेलें पाहिजे.

**वेणी०**—जा पण लवकरच ये. पीरपूखुरचा जमीनदार **बो** बाजारांत येऊन राहिला आहे. "दातव्य सभे" चें वर्ग-

लीन. मीं आपली थट्टा केली. तूं माझी प्राणेश्वरी, प्रियतमा, तुला का मी मारीन?

**दामिनी.**—आणखी भांडायचें काम नाहीं. मी मेलें ह्मणजे दोघांनाही चांगलें होईल.

**वेणी०**—ईश्वर करो आणि असें न होवो. असें झालें तर माझ्या संसाराची काय वाट? माझ्या घरांत घारी व घुबडें आपलें ठाणें देतील.

**दामिनी.**—मी आपली भांडखोर आहें झालें. तुह्मांला मात्र भांडण कसें तें माहीत नाहीं.

**वेणी०**—प्रिये, भांडण कसलें? तें हलकट लोकांचें काम. दामिनी (विजे) नंतर वज्रघात हा आपला ठेवले-लाच. प्रिये तूं तर स्वर्गीय वस्तू.





**अखिल०**—

फिरुनिहि गगनीं कां आजि इंदू उदेला ॥
अकरुण रडवाया ह्या अभागी जनाला ॥
प्रतिरजनि फिरोनी द्यावया दुःख येतो ॥
जडमति मजशीं का वैर हा वागवितो ॥ १ ॥

**हिरा०**—वाहवा! वाहवा! काय चमत्कार?

**अखिल०**—

करुं तरि गत कैशी? प्रेयसी साध्य नाहीं।
हत मन परि तीचा छंद सोडीत नाहीं ॥
अविरत विरहाग्नी जाळितो सर्व काय।
उपशमकर त्याचा आढळेना उपाय ॥ २ ॥

**हिरा०**—एक्स्लेंट, फार उत्तम. पुन्हां एकदा (यन्समोअर.)

किति सुखद तरी हा त्या शशी हाय रात्री ।
गुज करित मदंकीं जैं वसे चारुगात्री ॥
अमृतमधुर भावी सौख्यसंकल्प केले ।
शशिमुखि सहकारें व्यर्थ ते आजि गेले ॥ ३ ॥

**हिरा०**—कां बाबू, हीं पद्यें **विद्यासुंदरांतील** आहेत कां तुह्मीं रचलेलीं?

**अखिल०**—ही एका महाकवीची उक्ति आहे. हा एक हायकोर्टांतला वकील असून मोठा प्रेमळ आहे.

**हिरा०**—तुह्मी ह्मणतां तें खरें असेल. वकिलाशिवाय प्रेमळपणा कोठला? वकिलाशीं एकदां गांठ पडली ह्मणजे त्याच्या तावडींतून सुटणें मोठें मुष्किल.

**अखिल०**—का रे, हिरालाल, मी निघून आलों व तूं बसला होतास, माझ्याबद्दल कांहीं गोष्टी निघाल्या होत्या का?

**हिरा०**—हो, हो, निघाल्या होत्या तर. जेवढा वेळ मी बसलों होतों तोंपर्यंत तिनें तुमच्याच गोष्टी चालविल्या होत्या. मला ह्मणाली, हिरुदा, माझें मन मोठें खराब आहे, व मग तुमच्या सारखीच कवितेंत बोलूं लागली. कोकिलेच्या व तुमच्या नामसादृश्यावरून किनई तिनें कोकिल कुहु कुहु व अखिल उहु उहु व त्यापुढें हूं हूं टुहू जोडून एक कविता रचिली.

**अखिल०**—कविता! कविता!

**हिरा०**—व मग वर डोकें करून तिनें एक दीर्घ निश्वास सोडलान.

यार करा ह्मणजे ती खुष होईल.

**अखिल०**—आतां बहुतेक संध्याकाळ झालीच. सुनील आकाशांत चंद्र उगवेल, ज्योत्स्ना फांकेल, कुमुदिनी आनंदित होतील, पण माझी वाट काय? माझें तर प्रियाशून्य, प्रेमशून्य, उद्यमशून्य व उद्देश्यशून्य जीवन झालें आहे.

**हिरा०**—तर मग रात्र पडतांच जाऊं. थोडे रुपयेही बरोबर असूं देत. तिची आई फार पाजी आहे. तिला पैशाची फार हांव. तिला प्रणय बिणय कांहीं कळत नाहीं. तिला कांहीं तरी दिलेंच पाहिजे. कां, मग चलशील ना?

**अखिल०**—छे, छे, असें तर होणें नाहीं. असें केलें तर ती मला अप्रणयी ह्मणेल. खरोखर तीही माझ्याच सारखी उत्कंठित असेल. चंद्र आपल्या किरणांनीं मला जाळील अशी तिलाही भीति वाटत असेल. असेंच असेल तर गंभीर रात्रीं चांदण्यांत पडून विरहकल्पनेंत ती पोहत अ-

लागेल ?

**अखिल०**—काय ? प्रणयांत मला प्रतिस्पर्धी. पारुलच्या प्रीतीकरितां संग्राम. वा:, तसें होईल तर फार चांगलें. मग तिच्याविषयीं माझें किती प्रेम आहे तें दाखवीन. संसार सोडीन, दाढी राखीन, काषाय वस्त्रें परिधान करीन, योगी होऊन अरण्यांतून अरण्यांत व गुहेंतून गुहेंत हिंडेन. तीक्ष्ण सुरीनें हृदय कापून पारुलविषयीं माझें किती प्रेम आहे तें तिला व सर्व जगाला दाखवीन.

**हिरा०**—महाराज, असे खुनापर्यंत येऊं नका. पोलिसांनीं मध्यें पडण्याचा प्रणय नको.

**अखिल०**—हिरु, मला वाटतें प्रणयाची तुला कल्पना देखील नाहीं. हे सर्व प्रणयाचे अंक व गर्भांक आहेत, त्याच्या शेवटीं संम्मीलन हें आपलें आहेच.

**हिरा०**—संम्मीलनाच्या आधींच गर्भ ?





पाहिजे. ( हिरालाल जातो. )

**अखिल०**—हे रजनी देवी, आतां विलंब कां? माझ्या अंगाचा दाह करण्यास लवकर ये. हे चंद्रा, तूंही लवकर उदय पावून ज्योत्स्नारूपानें मजवर अग्निवृष्टि कर. हे तारागणांनो, तुह्मीही माझें दुःख पाहून मला हंसा. मी सर्व सहन करीन. चिन्ता! चिन्ता! चिन्ता! चिन्तेशिवाय मला दुसरा कोणचा उपाय आहे? कोठें जाऊं? कोठें जाऊन एकांतांत चिन्ता करीत बसूं? कलकत्त्यासारखें प्रेमशून्य स्थान जगांत कोणचेंच नाहीं. कलकत्त्यांत वन नाहीं, प्रस्रवण नाहीं, पर्वत नाहीं, अधित्यका, उपत्यका, मरुभूमि कांहीं नाहीं. कलकत्त्यांत विरहाला उपाय नाहीं. जिकडे माझे डोळे नेतील तिकडे जावें. पारुल, पारुल, हे माझे प्रियकर पारुल कुमारी!! ( प्रस्थान. )

---

आली असशील.

तरु०—बसून काय करूं?

आमो०—घरीं तरी कोण श्यामसुंदर बासरी घेऊन वाट पाहत बसला आहे?

तरु०—नसला माझा श्यामसुंदर तर नसला. मीच गोपी व मीच श्याम. तूं मात्र या वेळीं आपली तयार ऐस. तुझ्या बांक्या श्यामसुंदराची येण्याची वेळ झाली.

आमो०—माझा बांका श्यामसुंदर मदनमोहन.

तरु०—आहाहा. त्याचे दिव्य केंस कोठून तरी गिल्ट करून आणले आहेत असें वाटतें.

आमोदि०—तुझ्या नवऱ्याचे तर केंस काळे आहेत ना? परंतु दुःखाची गोष्ट एवढीच आहे कीं तो तुजकडे बघत देखील नाहीं व त्याची शेंडी देखील तुझ्या दृष्टीस पडत नाहीं.





ह्मणून बायकांना काय होतें तें मला समजत नाहीं.

**तरु०**—जर समजतें तर मग कशाला विचारलें असतेंस?

**आमोदि०**—**तरु**, तूं बाहेरून मात्र आनंदी आहेस असें दाखवितेस, परंतु नवऱ्याची गोष्ट काढली कीं दुसऱ्याच कांहीं गोष्टी काढून ती गोष्ट उडवितेस. तुला वाटतें कीं दुसऱ्या कोणालाच हें कळत नाहीं. नटण्या थटण्याचें हेंचना वय. तूं चांगली वेणी घालीत नाहींस, चांगलीं लुगडीं नेसत नाहींस, तुझे सर्व दागिने पेटींत बंद कां? तुझीं अत्तरें वगैरे सडून कां घालवितेस? **शान्ता** सांगत होती कीं वहिनी नांवाला मात्र जेवायला बसते. तर हें सर्व असें कां?

**तरु०**—तुला कळत नाहीं का कां तें. कोणाकरितां वेणी घालूं? व कोणाकरितां नटूं थटूं? स्त्रियांशिवाय स्त्रियांच्या मनच्या गोष्टी कोणाला कळणार? तूंच सांग कीं स्त्रियांचें नटणेंथटणें हें त्यांच्या सुखाकरितां का आहे?

दैवांत पतिप्रेम नाहीं ना ?

**आमो०**—तुझें ह्मणणें कांहीं खोटें नाहीं. परंतु पति असून पतिप्रेम नसणें मोठेंच दुर्दैव. **शान्तेचा** नवरा मेला तो तर परत येत नाहीं. माझ्याविषयीं पुससील, तर मी तुला खरें सांगतें कीं पहिल्या पहिल्यांदा मला वाईट वाटे, परंतु पुढें विचार केला कीं झालें तें तर आतां टळत नाहीं ना ? मग परमेश्वरानें जें थोडेंसें सुख आपल्या कपाळीं लिहिलें आहे तें तरी मनाशीं जळफळ करून कां गमवावें ? मनाशीं विचार केला कीं स्वरूप, व यौवन हीं किती दिवसांचीं ? थोड्या दिवसांनीं माझेंही तारुण्य निघून जाईल. तरु, खरें सांगूं, तुझे आजोबा माझी फार काळजी करतात व मजवर प्रेम करतात ह्मणून ते सर्व विचार विसरून गेलें. तुलाच ह्मणून सांगतें कीं माझा नवरा ह्मातारा आहे असें आतां एक वेळ देखील माझ्या मनांत येत नाहीं. परंतु तुझें सर्व चांगलें





परंतु तूं देखील माझ्याकरितां—आहा वन्स आल्या!

(शान्ता येते.)

**शान्ता.**—आमची वहिनी ह्मणजे मोठी चमत्कारिक आहे. मीं तिला सांगितलें होतें, कीं पूजा वगैरे आटोपून आपण बरोबरच जाऊं, परंतु तिला कोठला इतका दम. ती तशीच एकटी आली.

**तरु॰**—वाहवा! माझा काय दोष? आजीनें गच्चीवरून मला हाक मारिली ह्मणून आलें.

**शान्ता.**—तुझा आवाज असा जड कां? तोंड सुकून गेलें आहे व डोळे भरून आले आहेत, हें असें कां?

**तरु॰**—आमच्या वन्संना दिवसाच स्वप्नें पडतात. आतां मला काय झालें आहे?

**शान्ता.**—मी तरी तेंच विचारतें आहें, कीं इतक्यांत तुला काय झालें?

परंतु हें काय वेड त्याच्यांत शिरलें आहे तें सांगतां येत नाहीं. "शुभदृष्टीची" वेळ अशुभ होती असें वाटतें.

**आमोदि०**—ह्मणून पोरीनें जन्मभर का रडत बसावें? काळी व कुरूप असती तर कांहीं शोभतें. अशी सोन्याची पुतळी, शिवाय आलिकडच्या मुलांना जें पाहिजे तें सर्व ह्मणजे, लिहिणें, वाचणें, कशिदा काढणें वगैरे सर्व तिला येतें. शिवाय विनोदी तरी किती? तुझ्या दादाला आणखी काय पाहिजे तें मला कळत नाहीं.

**तरु०**—आजी, ह्या गोष्टी जाऊं दे. दुसऱ्या कांहीं असल्या तर काढा.

**आमो०**—"विरहिणीकथा" आतां पुरेत, "सखीसंवाद" चालूं द्या. मारून मुटकून प्रीति होत नाहीं असें जो ह्मणतो त्याला कांहीं कळत नाहीं. आपली प्रीति आपल्या प्रियकराला उधार दिली पाहिजे. प्रेमपूर्ण अशा तुझ्या हृदयांतून





मग पहा बरें तुझा प्राण चोरीस जातो कीं नाहीं.

**तरु०**—कोणास ठाऊक? पण आपला हा विनोद मला कांहीं कळत नाहीं.

**शान्ता.**—वहिनी, आजीचें ह्मणणें ऐक. तिचा उपदेश घे. व आपल्या नवऱ्याची प्रीति संपादन कर. माझें कपाळ तर फुटलेंच आहे. आतां देवाब्राह्मणांची पूजा, आईची चाकरी, व तुह्मां दोघांचें सुख, व तुह्मांला होणाऱ्या मुलांचें संगोपन, याखेरीज मला दुसरें कोणचें सुख उरलें आहे?

**आमोदि०**—अखिलाला काय झालें आहे तें तुला ठाऊक आहे का? तो अजून कच्चा आहे. दुसऱ्याच्याच ओंजळीनें पाणी पितो झालें. कांहीं कादंबऱ्या वाचून एक गोष्ट शिकला आहे. ती 'प्रणय'. प्रणय ह्मणजे काय तुला ठाऊक आहे? प्रणय ह्मणजे बायकोनें काम करावयाचें नाहीं, आपण करायचें नाहीं. रात्रंदिवस सजून नटून राहून

निमित्तानें, कधीं विड्याच्या निमित्तानें, तुला नवऱ्याकडे पाठवीत जाईन.

**तरु०**—बरें, ऐका, ऐका.

**शान्ता.**—वहिनी जात नाहीं का? जाते. मी पाठवितें, आई पाठविते, परंतु ही गेल्याबरोबर हा बाहेर निघून जातो.

**तरु०**—शिवाय त्या दिवशीं मला शिव्याही दिल्या व ह्मणाले तूं माझ्या घरी कां?

**आमो०**—बोलले तर बोलले, त्याचें काय. पतीपुढें स्त्रीला मान अपमान कसला? विनोद, हंसणेंसंवरणें, गप्पा गोष्टी वगैरे जें तूं आमच्याशीं संपवितेस तें सर्व नवऱ्याकरितां राखून कां ठेवित नाहींस.

**तरु०**—अशी जबरीची प्रीति मला नको.

**आमो०**—तर आपला मान कोळून पी. नवऱ्याची प्रीति संपाद व मग मान दाखीव. पतीला वश करण्याचा





आजकाल होति न वश, पति असे सये।
आवडती इंग्रजि त्यां, ढंग नवनवे ॥ ध्रु० ॥
पेडांची वेणि न ती त्यां रुचे जुनी।
बुचडाही येत नसे फारसा मनीं।
पाठिवरि मुक्तकेश, घालुनियां एकपाश
त्यावरती पुष्पवेश हें तयां हवें ॥ आज० ॥ १ ॥
शिककाई घाण नको सोप सुंदर।
उटणें ही घाण; बरी हेरपाउडर।
मर्यादा भीड जुनी टाकुनियां उघडपणीं।
झुमकत ती नटुनि थटुनि, स्त्री रुचे सये ॥ आज० ॥२
जाकिट हें गोड दिसे, चोळी बेढब।
काच बरि नाहिं करीं, रौप्य दे चव।
ब्रुच खुले फार उरीं, माळ सरी जाच करी।
निटिलीं जरि लांब चिरी, क्रोध त्यांस ये ॥ आज० ॥३

**तरु०**—तुझ्यासारखी रसिकता मजजवळ कोठें आहे?

**शान्ता.**—वहिनी, आजीनें चांगलें सांगितलेंन. एखादे वेळ प्रार्थना करून, एखादे वेळ अपमान साहून जर नवरा वश होत असेल तर तसें नकोका करायला? मी तर ह्मणतें कीं माझे जर कोणी दोन्ही हात तोडून माझा पती परत आणून भेटवील तरी देखील मी आपल्याला भाग्यवान् समजेन.

**आमो०**—चिरकाल जरी असें करावें लागलें तरी काय हरकत? स्त्रीचा पती व मनुष्याचा घोडा हीं दोन्ही सारखींच.

मग खुशाल वर स्वार व्हावें व चाबूक ओढावेत. माझी गोष्ट ऐक, जर त्यानें धरूं दिलें नाहीं तर धांवत जाऊन धरलें पाहिजे. असें सुंदर मुख, इतके सुरेख डोळे, मिष्ट हास्य, मधुर वाणी यांपैकीं कांहींच का मनांत भरणार नाहीं. एक दिवसानें नाहीं तर दोन दिवसांनीं, दोन दिवसांनीं नाहीं तर दहा दिवसांनीं होईलच वश. पाण्याच्या थेंबाथेंबानें पाषाण देखील झिजतात.

**शान्ता.**—आजी, तुझ्या आशीर्वादानें जर माझ्या दादाचें मन फिरलें तर—

(पडद्यांत मृत्युं०—कां गे स्वैपाकघरांत का आहेस.)

**तरु०**—अगबाई, आजोबा! वन्सं, चला, चला.

**आमो०**—शानू, बैस ग जरा.

**तरु०**—नको, वन्सांशीं माझें कांहीं काम आहे. चला वन्सं.

**आमो०**—तर मग उद्यां दुपारीं जरा लवकरच ये. किती दिवसांत आपण खेळलों नाहीं.

**तरु०**—दुपारीं कशाला. आज रात्रींच येईन.

**आमो०**—येच तर मग. आंबा कसा तो तूं अजून चाखला नाहींस. मी तुला एक साठ देतें.

**तरु०**—तुलाच डोहाळे व्हायला लागले आहेत. आधीं तूं खा, मग वाटेल तर मला दे.

(**तरु व शान्ता** जातात.)

**आमो०**—काय ह्या दोन्ही पोरींचें दुर्दैव?

**मृत्युं०**—अन्हिक करायाला तर आलों. परंतु तुला पाहतांच माझें आद्यश्राद्ध होतें.

**आमो०**—मला शिव्या कां?

**मृत्युं०**—तसें नाहीं, तूं आजन्म सुवासिनी राहून माझ्या वयाच्या साठ वर्षांत आणखी साठ वर्षें मिळवून दीडशें वर्षें वांच. अहाहा! आज शृंगार केल्यामुळें तूं फारच खुलतेस. नेहमीं शृंगार असतोच परंतु आज कांहीं विशेषच. वेणीची रचनाही कशी चमत्कारिक केली आहेस. मेलों, मेलों, आज अगदीं ठार केलेंस. "होती लज्जित रूप पाहूनि तुझें त्या सापिनी तापिनी. ॥"

**आमो०**—चुलींत गेल्या त्या कविता. माझ्या केंसावर साप! ऐकल्याबरोबर अंगावर शाहरे आले.

**मृत्युं०**—अग, तो साप नव्हे. हा साप गळ्यांत घालून मी तुझ्या प्रेमानें योगी झालों आहें.

**मृत्युं०**—शान्तेकडे पाहिलें ह्मणजे एकवार असें मनांत येतें कीं विद्यासागरचेंच ह्मणणें ठीक. विधवाविवाह होणें चांगलें. अरेरे किती कवळी पोर!

**आमो०**—माझ्या जसें मनांत आहे तसें शान्ता करणार नाहीं. अशी सुरेख पोर आणि या वयांत धर्मावर श्रद्धा ठेऊन मन कसें कह्यांत ठेवलें आहेन्. एक दिवशीं तिचें मन पाहण्याकरितां मी विधवाविवाहाची गोष्ट काढिली, तेव्हां ती काय ह्मणते. आजी, विवाह ह्मणजे कांहीं बाजारची चीज नव्हे. स्त्रीपतींचा चिरकालचा संबंध. पृथ्वीवर काय दोन दिवस वास. माझा जर पुनर्विवाह झाला तर मेल्यावर कोणत्या पतीकडे जायचें ?

**मृत्युं०**—अहा काय ज्ञान! केवढा विश्वास! स्त्रियांना कोण अबला ह्मणेल ? मारामारीच्या वेळीं त्या अबला खऱ्या





**प्रसन्न०**—हे बघ बाळा, तूंच जर पाहून सवरून कर-शील तर माझा विश्वास बसेल. अखिल पैसा उधळीत नाहीं हें खरें; तो माझा मुलगा नव्हे. त्याचें मन ठिकाणावर नाहीं, तूंच त्याला आपला भाऊ समजून कामधंद्याकडे त्याचें लक्ष लावून त्याला संसारी करशील.

**वेणी०**—तसें होईलच, यांत काय संशय. पैशाकडे एकदां लक्ष लागलें कीं डोक्यांतलें वेडबीड पार निघून जातें, शिवाय हें काम दुसऱ्याकडे सोपवितां येत नाहीं. ह्मणून मीच डाक्तरी करूं लागलों आहें. कारण औषधविक्रीकरतां मग दुसऱ्या डाक्तराची खुशामत करायला नको.

**प्रसन्न०**—अखिलाला तुझ्या हवालीं केला आहे, त्या-मुळें मी निश्चित आहें. जसा मला अखिल तसाच तूं. लहान-पणापासून तुह्मी दोघे एका ठिकाणींच खेळलां संवरलां आहांत, व तुमचें लिहिणें वगैरे एकत्रच झालें आहे.





तल्यामुळें रोज इकडे येण्याला फावत नाहीं. जेव्हां शिकत होतों त्या वेळीं तर रात्रंदिवस येथेंच पडून असें. थोडें पाणी तर मागवा. फार तहान लागली आहे.

**प्रसन्न०**—नुसतें पाणीच का ? थोडें कांहीं खा ना.

**वेणी०**—नको. आतां खाऊनच घरांतून निघालों, आतां कांहीं भूक नाहीं. या वेळीं नुसतें पाणीच प्यायला काय हरकत आहे ?

**प्रसन्न०**—बाळे शान्ते, तुझ्या वेणीदादाकरितां एक पेलाभर गार पाणी आण पाहूं ?

(पडद्यांत शान्ताः—आणतें.)

**वेणी०**—आई, शान्तेच्या तोंडाकडे पाहवत देखील नाहीं. लहानपणीं मी किती तिचे लाड करीत होतों. किती खेळणीं देत होतों. शिकवीत सवरीत होतों. गुरूजीजवळ शिकणें तिला आवडत नसे, पण मजजवळ मोठ्या आनंदानें शिके. त्याच शान्तेची सध्यां काय स्थिती झाली आहे !

**प्रसन्न०**—माझ्या पापाचें प्रायश्चित्त, दुसरें काय ?

(पाणी घेऊन शान्ता येते.)

**शान्ता.**—हें घे पाणी.

**वेणी०**—का गे शान्ते, तब्येत बरी आहे ना ?

**शान्ता.**—हो, वहिनीची तब्येत ठीक आहेना ?

**वेणी०**—हो.

**शान्ता.**—तिला भेटून किती तरी दिवस झाले, तिला एक दिवस आमच्या घरीं पाठवून दे फिरे ?

वस पाहून काय करावयाचें?

**वेणी॰**—आईचें ह्मणणें आहे कीं, अखिलाचें मन स्वस्थ बसून बसून बहकलें आहे. ह्मणून त्याच्याकरितां एखादा उद्योगधंदा काढावयाचा आहे. मी सध्यां होम्योपाथी डाक्तरी करतों आहें कीं नाहीं, त्याच्याच करितां एक दवाखाना काढायचा विचार आहे. अलीकडे तूं कांहीं वाचतेस बिचतेस का नाहीं?

**शान्ता.**—वेळ सांपडला तर काली–सिंहाचें महाभारत वाचतें.

**वेणी॰**—काली-सिंह कां ह्मणत नाहींस?

**शान्ता.**—तें तर माझ्या वडील भावोजींचें नांव.

**वेणी॰**—सर्व समजतें का?

**शान्ता.**—कांहीं कांहीं अवघड गोष्टी आहेत त्या सर्व कळत नाहींत.





[illegible] खरी प्रीति होती. त्या कुन्देनें आपलें प्राण नगें-
द्राला समर्पण केले होते परंतु तो तिला विसरला व त्याचें प्रायश्चित्त कुन्देला मिळालें.

**शान्ता.**—प्रीति कसली? हिंदूच्या घरांत पुनर्विवाह ह्मणजे मोठें पाप.

**वेणी०**—**शान्ते,** ही तुझी चूक आहे. विधवाविवाह शास्त्रसंमत, विद्यासागरानें त्याला आधार दाखविले आहेत. तूं तर रामायण वाचलेंच आहेस. त्यांत मंडोदरी व तारा ह्यांचे पुनर्विवाह झाले आहेत का नाहीं?

**शान्ता.**—वाहवा वेणीदादा, दृष्टांत तर खूप काढलास. एक राक्षसी व दुसरी वानरी. माझ्या सासरच्या गांवीं कांहीं हलक्या लोकांत पोरांना मांडीवर घेऊन पुनर्विवाह करतात. परंतु कुळवानाच्या घरांत कसा होईल?

**वेणी०**—होत नाहीं ही मोठी चूक आहे. तूं स्वतांचाच

संवय होते; व कष्ट कष्ट ह्मणून जें काय ह्मणतोस तें सर्व शरीराला. मेलें ह्मणजे संपलें. सुख दुःख हें सर्व मनाचें व आपल्याच हातीं. मेल्यावर खात्रीनें स्वपतिप्राप्ति. मग तर विधवा होण्याची भीति नाहीं ना. माझा पति स्वर्गीं जाऊन देव झाला आहे. आतां तर मी देवस्त्री.

**वेणी०**—(गद्गद स्वरानें) शान्ते, तुजवर माझें फार प्रेम. अगदीं लहानपणापासून प्रेम आहे. तुझें दुःख पाहून माझें मन कळवळतें ह्मणूनच मी बोलतों.

**शान्ता.**—दादा, मजकरितां उगाच दुःख करूं नको. एक अर्थी माझें आहे तें चांगलें आहे. पहिल्या पहिल्यांदा फार दुःख होई. तेव्हां कळत नसे व मनाची समजूत घालतां येत नसे, ह्मणून रात्रंदिवस रडत असें व ईश्वराचा धांवा करीत असें. त्याचा धांवा करतां करतां मनाला आराम वाटूं लागला. जणूं काय कोणी माझ्या कानांत सांगितलें





**वेणी०**—बरें आज राहूं दे. आणखी एखादे दिवशीं तुझी समजूत पाडीन.

**शान्ता.**—मला सर्व समजलें.

(जाते.)

**वेणी०**—लक्ष्मी व सावित्री ह्या देखील हिच्या पुढें हार जातील. तिच्या मनांत जितकी जितकी पापभीति जास्त तितकें तितकें माझेंही तिच्यावरचें प्रेम जास्त. तिचें पावित्र्य भ्रष्ट करण्याची माझी इच्छा नाहीं, तर तिच्याशीं विवाह करण्याची आहे. शान्ता जर माझी स्त्री होईल तर मी धन्य होईन. किती कोमल, किती सरल? विधवा होऊनही रूपानें शतपट वाढली आहे. (जातो)

---

[illegible]
व्यापोनी निज सौरभें बकुल हा टाकीतसे मेदिनी ॥
सौभाग्यें विमलें तथा परिमलें सर्वांस या जिंकिल ।
ऐसें पुष्प जगांत एक रमणी—
पारुल ती पारुल ॥ २ ॥

स्वर्गांपासुनि सागरान्त विहरे स्वच्छंद भागीरथी ।
गर्जे, नाद करी, कधीं खळखळे वाचाल साऱ्या पथीं ॥
कोणाचा करण्यांत नामजप हा ही स्वर्धुनी संकुल ॥
तीतें एकचि जप्य या त्रिभुवनीं,—
पारुल ती पारुल ॥ ३ ॥

होतें नीरस शुष्ककाष्ठसम हें माझें घरीं जीवित ।
त्यातें प्रीतिसुधारसें करित जी सिंचूनी आप्यायित ॥
जीचें दर्शन चंद्रचंदनसुधामुक्तांहुनि शीतल ।
माझी आवडती सती गजगती—
पारुल ती पारुल ॥ ४ ॥





आलेंच पाहिजे. हे घ्यावे विडे.

**अखिल०**—शान्तेला यायला नाहीं का फावलें? मोलकरीण कोठें आहे?

**तरु०**—माझ्या हातून घ्यायला कांहीं दोष आहे कीं काय. मोलकरणीपेक्षां का मी हीन?

**अखिल०**—तें कांहीं नाहीं. त्या दिवशीं मीं शिव्या दिल्या त्यावर इतके दिवस आली नाहींस.

**तरु०**—इतके दिवस आलें नाहीं ह्मणून कधींच यायचें नाहीं कीं काय?

**अखिल०**—नाहीं, नाहीं. कधींच यायचें नाहीं. तुला सर्व ठाऊक आहे व मीं सर्वांना सांगितलें आहे कीं तुझा व माझा प्रणय होत नाहीं. तुझा माझा स्त्री-पति-भाव शक्य नाहीं.

**तरु०**—तर माझें नशीब. बरें पण विडा तर घ्याल?

तरु०—दोन घटका बसून गेले तर. जर एखादा सभ्य गृहस्थ कोणी आपल्याकडे येता तर थांबतां का नाहीं?

**अखिल०**—जा, जा, आई आतां येथें येईल.

**तरु०**—त्या तर आतांच पूजेला बसल्या आहेत.

**अखिल०**—तूं जा, तूं जा, तुला आज झालें आहे तरी काय?

**तरु०**—आपल्या तोंडून दोन गोष्टी ऐकण्याची इच्छा झाली आहे.

**अखिल०**—कसल्या गोष्टी ऐकतेस?

**तरु०**—आपल्याला वाटतील त्या. रागें भरा, निदान दोन शिव्या तरी द्या.

**अखिल०**—मी का तुला शिव्या देतों?

**तरु०**—तर मग दोन प्रेमाचे शब्द बोला. कोणाच्या मुखाचें चिंतन चाललें होतें?

**अखिल०**—मुख कोणाचें, आणि चिंतन कसलें? ए-

५





नको. तूं जा, निघ कशी.

**तरु०**—असलें ह्मणून काय झालें, प्रणय जडण्याची भीति नका पडूं देऊं?

**अखिल०**—शुद्ध प्रणय होणार नाहीं हें माहीत आहे. परंतु हमेशा जवळ राहिल्यानें व बोलल्याचालल्यानें एक प्रकारचा खोटा ह्मणजे तुह्मां हिंदु लोकांचा प्रणय जडतो.

**तरु०**—साहेब, तुमचा प्रणय कसा असतो तें तर मला समजून सांगा.

**अखिल०**—तें तुला कळायचें नाहीं. मराठींत त्याला बरोबर शब्द नाहीं. इंग्रजींत त्याला 'लव्ह' ह्मणतात. त्यांत 'रोमान्स'ही असला पाहिजे. तूं जा, तूं जा, मला त्रासवूं नकोस. मी फिरायला जातों.

**तरु०**—जा, पण माझी एक गोष्ट ऐकून जा. तुह्मी कां त्रासतां तें तर मला सांगा पाहूं. उगीच कांहीं तरी भलतें-सलतें मनांत आणतां व आपण कष्ट भोगतां व मलाही

मी कोण होऊं ? आपण जें सांगाल तें करीन. मला समजून सांगा, शिकवा, आपण सुखी व्हा. आपली वागणूक मला चांगली माहीत आहे. आपल्यांत जर दोष असता, आपण जर बाहेरख्याली असतां, तर मीं इतकी विनवणी केली नसती. मी खरें सांगतें. मी केवळ स्वतांकरितां बोलत नाहीं. आपण सुखी व्हा, व मी आपल्याला आवडेन अशी मला करा. इतकी माझी हात जोडून विनंति आहे.

**अखिल०**—तुला समजायचें नाहीं; प्रणयाच्या लायकीची तूं नाहींस. तुझ्या चेहऱ्यांतच 'रोमान्स' नाहीं.

**तरु०**—तें काय?

**अखिल०**—तें तुला समजायचें नाहीं. रोमान्स काय आहे हें तुला ठाऊक आहे? त्यापासून 'रोमॅन्टिक' शब्द निघाला आहे. तो एक निराळाच भाव आहे. अपूर्वदृष्ट, स्वप्नमय प्रेमानें तो हळूहळू आपोआपच चेहऱ्यावर उमटूं





बचावेल, नाहीं तर सर्व नाश होतो. असें गोड गोड बोलून तर ह्या हिंदु स्त्रिया नवऱ्याचें डोकें उठवितात. मी प्रतिज्ञेवर सांगतों कीं मीच ह्मणून सुटलों. दुसरा कोणी असता तर खास पाशांत सांपडता. मला फार सावधगिरीनें वागलें पाहिजे. मन केव्हां पालटेल त्याचा नेम नाहीं. पांच चार दिवस जर अशा कथा कानीं आल्या तर एक प्रकारचा अपवित्र प्रणय उत्पन्न होतो. (प्रसन्नमयी येते.)

**प्रसन्न०**—सूनबाई आली होती वाटतें? तिला तूं शिव्या दिल्या असशील ह्मणूनच ती रडत रडत गेली.

**अखिल०**—लागेल असें मी कोणालाच बोलत नाहीं. माझ्या खोलींत आल्याबरोबरच मीं मना केलें व आतांही करतों.

**प्रसन्न०**—कां बरें अशी पोरीची दुर्दशा करतोस? तूं कांहीं नेणतें मूल नाहींस. तुला सर्व समजतें, मग ही तुझी रीत चांगली का आहे?

मला कळत नाहीं.

**अखिल०**—तें नाहींच कळायचें. पूर्वी प्रणय नव्हताच. मग कोठून कळणार?

**प्रसन्न०**—बरं बाबा, तें कांहीं असो. लग्न करून तिला घरांत आणिली आहे. आतां तिला सोडायची तर नाहींना? दैवांत जें होतें तें झालें. आतां हिलाच घेऊन संसार केला पाहिजे.

**अखिल०**—इंपॉसिबल्, अशक्य!

**प्रसन्न०**—ऐक, माझें सांगणें अव्हेरूं नकोस.

**अखिल०**—तें दुसऱ्या गोष्टींत. प्रणयाच्या गोष्टींत हात घालण्याचा आईबापांचा अधिकार नाहीं.

**प्रसन्न०**—मी आणखी किती दिवस! आजपासून आपला संसार तूंच बघ. मी मेल्यावर कसें होईल?

**अखिल०**—व्हायचें तें होईल. मला काय त्याचें.





आतांच हें काय? काळींगेंद्री असती व दुसऱ्या इतर खोडी जर तिच्यांत असत्या तर तुझें ह्मणणें शोभतें. पहिल्या पहिल्यांदा वाटे कीं लहान आहे ह्मणून असें करतो; कळूं लागलें ह्मणजे आपोआपच ताळ्यावर येईल. मुलगी तर साक्षात् लक्ष्मी आहे. तोंडांतून एक अ देखील काढीत नाहीं. दुसरी एखादी असती तर रामायण करती.

**अखिल०**—तुझी चटचट चालूं दे. मी जातों. माझ्या प्रणयावर वज्राघात करून माझा सर्वस्वी घात केलास, व आणखी वर ही कटकट. घरांत तर मला सुख नाहीं. पाहूं दुसरीकडे तरी कोठें मिळतें का?

( जातो. )

**प्रसन्न०**—गेला आं, माझें पोर मला दूर झालें!

( जाते. )

---

**वेणी॰**—होम्योपाथीची मला पहिल्यापासून आवड होती. ह्मणून थोडी थोडी शिकलों होतों. त्यावर आतां पुन्हा पुस्तकें वगैरे पाहून ठेवलीं आहेत, व आतां डिस्पेन्सरी सुरू झाली ह्मणजे आणखी पुष्कळशीं पुस्तकें आणीन ह्मणजे झालें. सर्व पुस्तकें पाठ करण्याची गरज नसते. पुस्तकें पाहून पाहून चिकित्सा करतां येते.

**मृत्युं॰**—पहा बाबा, मोठ्या काळजीनें काम कर. चिकित्सा करणें मोठें अवघड काम आहे. त्यांत जीवन व मृत्यु यांचा संबंध असतो.

**वेणी॰**—त्याची मला नाहीं का काळजी ?

**मृत्युं॰**—तर मोठ्या काळजीनें व दक्षतेनें काम कर. अखिलाला नेहमीं जवळ ठेव व त्याच्या हातून काम करीव. काम करतां करतां बहकलेलें मन ताळ्यावर येतें, व संसाराकडे लागतें. मला स्वतांला कांहीं मूलबाळ नाहीं. जें काय आहे





विद्यासागर महाशयांनीं त्याला आधार दाखविले आहेत.

**मृत्युं०**——आपणाला त्यांतलें काय माहीत. निरनिराळ्या मुनींचीं निरनिराळीं मतें. त्यांतलें ग्राह्य कोणतें व त्याज्य कोणतें हें ठरविण्याचें आपलें काम नव्हे. परंतु जें देशाचाराला योग्य त्यालाच धरून वागलें पाहिजे. शिवाय आणखीही एक गोष्ट आहे. ती अशी कीं लहान मुली विधवा झालेल्या पाहिल्या ह्मणजे मनाला वाईट वाटतें खरें, परंतु ह्या घोर कलियुगांत सर्व लोक भोगविलासांत मग्न. मुनी नाहीं. ऋषी नाहीं, व ब्रह्मचारीही नाहीं. देवतांना झोंप लागली आहे. संसारांत जसे ब्रह्मचारी तशा आमच्या विधवा आहेत. ह्यांच्याकडे पाहिलें ह्मणजे हिंदु धर्म अद्याप कायम आहे असें वाटतें. विधवा ह्या हिंदूंच्या घरांतल्या जागृत देवताच आहेत.

(एक भिकारी येतो.)

चालेल कसें?

**मृत्युं०**—जाऊंदे रे, बिचारा आशेनें आला आहे.

**वेणी०**—तुम्हांला समजत नाहीं, अशा लोकांना भिक्षा देणें ह्मणजे आळसाला मदत करणें आहे.

**मृत्युं०**—ऐकलेंत कां भटजी महाराज वेणी ह्मणतो तें खरें आहे. भिक्षा दिल्यानें पाप लागतें. तर काय करावें. जगांत निष्पाप असा कोणीच नाहीं. संसारांत अनेक पातकें करावीं लागतात. त्यांत आणखी हें एक, पाहूं तुमच्या दैवांत काय आहे तें? महाराज, आपणाला पैसा पाहिजे तो तर मजजवळ नाहीं, आतां पेटी कोण आणतो? ही पावली आहे ती घ्या. हीच तुमच्या दैवांत होती.

**भिकारी.**—आपलें कल्याण होवो व इच्छित मिळो.

**मृत्युं०**— झाली यांची बडबड सुरु. महाराज, आशीर्वाद देणें असेल तर मनांत द्या. बडबड करूं नका.





नको का कांहीं थांबलो?

**वेणी०**—तुमचा समज कांहीं निराळा आहे. बरें आहे, आतां मी जातों.

**मृत्युं०**—चाललास? बरें पण हिशोबबिशोब कसा ठेवतोस तें मला दाखीव. मी तुला फार सोपी रीत दाखवीन.

**वेणी०**—बरें आहे, पण आजोबा, तुमचे केंस परीटघडीप्रमाणें स्वच्छ कसे?

**मृत्युं०**—तुझ्या आजीचा हुकूम. आतां कलप लावण्याचें कांहीं कारण नाहीं, असें तिनें सांगितलेंन. आहे तें का वाईट दिसतें? ईश्वराच्या इच्छेआड जाणें ठीक नाहीं. त्याला आवडतें तर तेंच चांगलें.

**वेणी०**—बरें तसेंच कां असेना? मी जातों.

(जातो.)

जीचें दर्शन चंद्रचंदनसुधामुक्तांहुनी शीतल ।
माझी आवडती सती गजगती—
पारूल ती पारूल ॥ १ ॥

बायकामाणसांची थट्टा आपणाला चांगली करतां येते.

**अखिल०**—थट्टा कशावरून आपणाला वाटली?

**पारूल.**—कविता सुंदर झाल्या आहेत, ह्मणून आपणांला असें वाटलें कीं काय त्यांत लिहिलेलें मी सर्व खरें मानीन? चंद्र मला पाहण्याची इच्छा करितो, मी गुलाबाहून सुंदर!

**अखिल०**—मीं कांहीं दुसऱ्याच्या डोळ्यानें पाहिलें नाहीं.

**पारूल.**—भागीरथी ह्मणे माझें नामस्मरण करते!

**अखिल०**—काल संध्याकाळीं एकटा मी गंगेच्या तीरावर बसलों होतों तेव्हां मला भास झाला.

**पारूल.**—मीं कोणाच्या नीरस प्राणाला अमृतदान दिलें?





बोलत नाहीं. रचनापद्धति व कल्पनाशक्ति दाखविण्याकरितां मीं ह्या कविता केल्या नाहींत. लिहिण्याचे वेळीं कागद व लेखणीवर माझें लक्ष नव्हतें. माझ्या ह्रदयाचे तरंग आपोआप बाहेर आले आहेत.

**पारूल.**—निःसंशय तुह्मीं मला वेडी ठरविली आहे.

**हिरा॰**—मला दोन शब्द बोलण्याची परवानगी आहे का? "आपले" "आपणाला" वगैरे सोडून द्या. मला वाटतें जसें कांहीं अखिलबाबू आपल्या गुरुजीकडेच आला आहे.

**पारूल.**—तसें नव्हे हिरुदादा, अखिलबाबूसारख्या विद्वान् गृहस्थांना अरे तुरे माझ्याच्यानें कसें ह्मणवेल?

**अखिल॰**—जर आपण मला 'आपला' समजत असाल तर माझी हरकत नाहीं.

**पारूल.**—आपण जर मला 'आपली' मानतां तर मला आपल्याला आपले समजायला काय हरकत आहे?

**अखिल॰**—बरें, मी ह्मणेन, व तूंहि मला 'तूं' ह्मण.

**पारूल.**—आपण नाहीं नाहीं—तुह्मी ह्मणतां कीं एक वेळ पाहून तुमची मजवर प्रीति जडली, हें मी खरें कसें मानीन.

**अखिल॰**—आपण तर—

**पारूल.**—पुन्हां आपण.

**अखिल॰**—हा अभ्यास. तूं इतकी शिकलीसवरलीस. तुला सांगायला का पाहिजे कीं शुद्ध प्रेम एका भेटीनें देखील होतें. जगत्सिंहानें तिलोत्तमेला त्या मंदिरांत एकदांच

वेश्येजवळ कोठें प्रणय बोलला आहे ?

**अखिल०**—तूं मूर्ख. तुला प्रणयाची माहिती नाहीं. तूं वेश्या ? नाहीं, **पारूल**, तुला वेश्या कसें ह्मणावें. मी कधींही वेश्येच्या घरीं गेलों नाहीं. मी सत्य सांगतों माझ्या मनांत कुभाव नाहीं, मला तर तूं स्वर्गीय ज्योत दिसतेस. हें तुझें नेत्रद्वय प्रणयसलिलानें पूर्ण असें भासतें. ह्या तुझ्या निबिड केशराशींत प्रेमाच्या लहरी उठताहेत असा भास होतो. माझ्या दृष्टीनें तूं मानुषी नाहींस, देवी आहेस. मला विलासभोगाची इच्छा नाहीं. मला तुझी पूजा करावीशी वाटते. तुला हृदयांत सांठवून तुझी आराधना करावीशी वाटते. संसाराचें काय व्हावयाचें असेल तें होवो. सृष्टी कितीही रमणीय होवो. मला तिशीं कर्तव्य नाहीं, बाह्य चैतन्य नष्ट होवो परंतु अंतर्यामीं तुझ्या प्रणयांत मग्न राहीन. **पारूल**, सांग, सांग माझ्यावर तूं प्रेम करशील कीं नाहीं ?

६





**पारूल.**—तूं सांगितलेस वाटतें. तुला आतां मी कांहीं सांगणार नाहीं.

**अखिल०**—पारूल, तर मग तूं मजवर प्रीति करतेस. हेमचंद्र, ललित, विजय, आयव्हानहो, रोमिओ, या सर्वांना तूं मागें टाकतेस. कोणता नायक आज मजहून सुखी आहे.

**पारूल.**—तुमच्या सदऱ्याची गुंडी निघाली आहे ती मी घालतें.

**अखिल०**—पारूल, पारूल, किती तुझा हा कोमल हात!

**हिरा०**—अखिलबाबू! आतां विलंब कां? पारूलचें गाणें तर ऐक. गा एक चीज.

**पारूल.**—माझ्या गाण्यानें का यांना आनंद होईल.

**अखिल०**—कां नाहीं होणार? गाणें ह्मणजे प्रणयाचा अलंकार.

**पारूल.**—

पद—राग पिलु, ताल धुमाळी.

चाल—उद्धवा शांतवन कर जा.

कां सखा क्षण क्षण येतो, स्मृतिरूपें माझ्या चित्तीं ॥
प्रत्यक्ष दिसो कीं न दिसो, हृत्पटलीं अंकित मूर्ती ॥
किति यत्न जरी मीं केला, होईना पळही भ्रांती ॥
॥ चाल ॥ ये कर्णीं जरि तन्नाम । चमकत हें अंतर्याम ।
खेदांतचि उपजे प्रेम । येई त्या पूरचि अंतीं ॥ चाल ॥
मत्सखा गमे हळु घुसुनी । हृदयाशीं करि गुज गोष्टी ॥ १ ॥

पिऊन जा ना?)

**पारूल.**—ही काय कटकट? मी नुकती कोठें आपल्याजवळ येऊन बसलें तोंच हाकांला आरंभ. मला भूक नाहीं, मी आतां जात नाहीं.

(वामा येते.)

**वामा.**—चल ग, लवकर, एकदां पिऊन टाक ह्मणजे झालें. नाहीं तर पुन्हा थंड होईल. फार नाहीं. अडीच शेर तापत ठेवलें होतें त्यांतून फक्त अर्धा शेर उरविलें आहे.

**पारूल.**—(शिशुभावानें) मी दूध पिऊं का? मला आज बरें नाहीं.

**वामा.**—पी, कांहीं हरकत नाहीं. तुला जसें पाहिजे तसें केलें आहे. साय वगैरे काढून टाकली आहे.

**अखिल०**—पहा, कोण ही सरलता.

**हिरा०**—जा जा, एक घोंट घेऊन ये. दूध प्यायली नाहींस तर शरीरांत त्राण कसें राहील?

**वामा.**—तूं आली नाहींस तर त्या दिवसासारखी उचलून नेईन.

**पारूल.**—पाहूं बरें कशी नेतेस ती? मी बाबूंना धरून बसलें आहें.

**वामा.**—तुह्मी तरी सांगा, तुह्मीं सांगितलेंत तर पिईल.

**अखिल०**—तर जाना, पिऊन ये.

**पारूल.**—मी तुह्मांला हात जोडतें या वेळीं मला आ-

**वामा.**—तूंच आपला विचार कर. सांग बरें तूं जगशील कशी? भाताला कसा तो हात लावित नाहींस. पुरी वगैरे केली तर एखादा तुकडा खातेस व बाकीची मांजराला घालतेस.

**अखिल०**—माझ्या विनंतीला मान देऊन जा व पिऊन ये.

**पारूल.**—तुह्मी देखील आईच्या बाजूचे झालांत. पण मी सर्व दूध घेणार नाहीं.

**वामा.**—चल. चल. तुला पाहिजे तितकेंच पी. पहा बाबा, ही खात पीत कांहीं नाहीं. ताज्या लोणकढ्या तुपांत तळून मीं पुऱ्या केल्या त्यांतल्या रात्रीं दोन मोठ्या जुलमानें तिनें खाल्ल्या, त्यावर तुह्मी कधीं बरें आलां होतां, परवां वाटतें, त्या दिवसापासून तर ती अन्नाला शिवली नाहीं. कांहीं खाल्लें नाहीं, तर हें शरीर राहील तरी कसें?

(वामा व पारूल जातात.)

**अखिल०**—हिरालाल, ही गोष्ट तूं मला सांगितली नाहींस. परवां रात्रीपासून कांहीं खाल्लें नाहीं?

**हिरा०**—देवाशपथ ही गोष्ट मला माहीत नव्हती.

**अखिल०**—मीं देखील परवांपासून कांहीं खाल्लें नाहीं. दिवसा एकदां नांवाला मात्र जेवायला बसतों.

**हिरा०**—तसें असेल. महिन्यांतून आठ दिवस शान्ताही उपास करते, व मीही कांहीं खात नाहीं. प्रीति केली कीं कष्ट भोगलेच पाहिजेत. नेहमींच कोठें खायाला असतें?

**अखिल०**—पारूलची आई देखील मोठी भली दिसते.

लेलें जर कोणीं पाहिलें तर त्यांत आपला कांहीं अपमान आहे कीं काय ?

**अखिल०**—नाहीं, नाहीं. तसें कांहीं नाहीं. माझा कांहीं वाईट हेतु नाहीं. ह्मणून मी कधींच कोणाकडे जात नाहीं. हा जोडा वाजतोय. मला वाटतें वरच येतो आहे. मी खोलींत जाऊन दडतों. जर ओळखीचें नसलें तर बाहेर येईल.

( आंतल्या खोलींत जातो. )

**हिरा०**—काका आपला साधा मनुष्य, कांहीं भीति नाहीं.

( बिहारी येतो. )

**बिहारी.**—कां ग पारूल, मला पाहून पळून कोण गे गेलें ? हा हिरू, दुसरें कोण ?

**हिरा०**—दुसरें कोणी नाहीं. बैस.

**बिहारी.**—तर हे दुसरे दोन जोडे कोणाचे ? कोण आहेस बाबा, बाहेर कां येत नाहींस ? पारूल, सांग ग





बिहारी.— [illegible] घर आणि मला मनाई ?

( आंतल्या खोलींत जातो. )

**हिरा०**—मोठें संकट आलें. मला वाटतें पाहतांच तो त्याला ओळखील. मला वाटतें **बिहारी** काका व **अखिल** हे दोघे बरोबरच एन्ट्रन्स पास झाले.

( अखिल व बिहारी पुन्हां येतात. )

**बिहारी.**—अरे, हा तर **अखिलबाबू**. फार दिवसांनीं भेटला! अरे तुला हें व्यसन कधीं लागलें? माझ्या पोरीवर तुझें केव्हां प्रेम जडलें? मूर्ख लोक ह्मणतात कीं **अखिल** अगदीं बुकांतला किडा आहे. ये. ये. लज्जा कसली. इतके दिवस तूं माझा सहाध्यायी होतास, आतां जांवई झालास.

**अखिल०**—बिहारी, असें मनांत आणूं नकोस. माझ्या मनांत कुभाव नाहीं.

**बिहारी.**—तें काय मला माहीत नाहीं? शाळेंत होतास तेव्हांपासून तुझा पवित्र प्रणय मला माहीत आहे. इ-

कडे यायला तुला किती दिवस झाले? तुझ्या प्रणयाची भट्टी पक्की उतरली का नासली?

**पारूल.**—काका, बसा बसा, बाबूचा हात सोडा, बाबू-साहेब, तुह्मी या कोचावर बसा.

**बिहारी.**—कां रे अखिल, नुसता प्रणयच, का थोडी घेतलीही आहेस?

**हिरा०**—नाहीं, नाहीं, तुह्मीं फार दंगा आरंभला आहे. अखिलबाबू येथें कशाला आले आहेत, तें तुह्मांला माहीत नाहीं.

**बिहारी.**—ठाऊक नसायला काय झालें? देवीची पूजा करायला. वेश्येच्या घरीं लोक काय पितृश्राद्ध करायला जातात?

**अखिल०**—बिहारीबाबू, तें तुला समजायचें नाहीं. माझा कांहीं वाईट हेतु नाहीं. पारूलवर माझें शुद्ध भगिनी-प्रेम आहे.

**बिहारी.**—तें तर दिसेलच. आज काल सभ्य झालें कीं तें दिसूं लागतें. ह्यांच्या कोशांत भगिनी शब्दाचे दोन अर्थ, वेळीं जो योग्य दिसेल तो अर्थ घ्यायचा.

**हिराला०**—(अखिलास) दोन रुपये दे ह्मणजे याला दारूच्या नादांत लावतों. ह्मणजे येथून निघून जाईल.

**अखिल०**—हे घे तर रुपये.

**हिराला०**—दहा वीस रुपये येथें ठेऊन जा ह्मणजे हिची आई खूष होईल. बिहारी काका, चला हे पहा रुपये एक वेळ गुत्त्यांत जाऊन येऊं?

**बिहारी.**—सर्वोत्तम. अखिल, तुझ्या पवित्र प्रणयाच्या

**पारूल.**—तर खरेंच का जाणार?

**अखिल०**—कांहीं मनांत आणूं नकोस. आज आतां परवानगी दे. हा कागद आपल्या आईला दे. ( वीस रुपयांची नोट देतो. )

**पारूल.**—उद्यां केव्हां याल?

**अखिल०**—उद्यां आलेंच का पाहिजे?

**पारुल.**—तुह्मी येणार नसाल, तर माझ्या छातींत सुरी खुपसून जा. तुह्मीं मला काय केलें आहे तें कळत नाहीं.

**अखिल०**—**पारूल, पारूल,** मी काय ऐकतों आहें. खरेंच तुझी मजवर प्रीति आहे.

**पारूल.**—नाथ!

**अखिल०**—प्रणयिनी! प्रियतमे!

**पारूल.**—उद्यां दुपारीं जर तुह्मी आलां नाहीं तर **पा**रूल मेली असें समजा.

(जातो.)

**वामा.**—काय गे हें कूळ कसें काय आहे? नुसती ऐटच आहे का कांहीं जवळ आहे?

**पारूल.**—कां बरें **गो**कुळदत्त तुला माहित नाहीं का? पुष्कळ जमवून ठेवलें होतें. शिवाय हिरुदादानें मला सांगितलें आहेन् कीं त्याची विधवा बहीण आपल्या सासरची इस्टेट घेऊन येऊन ह्याच्याच घरीं राहिली आहे. घरचा कुलमुखत्यार काय तो हा.

**वामा.**—चांगला लाग लागला ह्मणजे ठीक.

**पारूल.**—ही घे, एक वीस रुपयांची नोट देऊन गेला आहे; त्याचें वर्तन मला तर निराळेंच दिसतें. आरंभीं आरंभीं पैशाची फार हाव करूं नकोस. मी तुझ्याकरितां रडतें, अन्न वगैरे खात नाहीं. असल्या गोष्टी मात्र त्याच्या समोर सांगत जा. पुढचें मग मी पाहून घेईन.

**वामा.**—इतक्या दिवसांच्या अनुभवानें तूं आतां शहाणी झाली आहेस मला ठाऊक आहे. इतरांसारखी त्याच्या मोहांत मात्र गुंतूं नको.

**पारूल.**—तें का मला समजत नाहीं? मी तेरा वर्षांची झालें तेंव्हांपासूनच तुला भिक्षेला जावयाचें बंद केलें.

**वामा.**—हिरालाल काय ह्मणत होता? त्याला कांहीं द्यायला नको का?

**पारूल.**—पाहिजे तर. मीं त्याला सांगितलें आहे, तो हमेशा मजकरितां गिऱ्हाइकें आणतो, त्याच्याशीं बेइमान

**पारूल.**—ती तर चांगली लागते. परवाची शिळी डाळ असली तर तोंडीं लावायला दे. चल चल लवकर, मी खातें.

( दोघी जातात. )

---

## पंचमगर्भांक.

### सहचरीच्या घरासमोरील रस्ता.

**भिकारी.**—

**पद.**

चाल. तो नर दुःखमुक्त झाला.

दारू जरि व्हावी, जरि व्हावी । देशी सडकुनि प्यावी ॥ध्रु०॥
शेरी झाली, व्हिस्की झाली, तीन स्टार ही झाली
भोला काळण येथें गाळी, सर्व तियेच्या खालीं ॥ १ ॥

[illegible], स्नेही झाला, पाजी पशी शेर
अबकारीचा, स्पेटर स्नेही, दंड न कारागार ॥ ३ ॥ दारु०

(हाराण येतो.)

**हाराण.**—काय हा त्रास! हा लेकाचा आज येथून जात नाहीं का! जगांतले सर्व कर्ण इकडेच राहतात कीं काय ह्मणून हा बेटा इकडेच भीक मागायला आला आहे? इकडे कोणी नाहीं असें समजून मी आलों, तों येथें आहेच. कायरे, ए ठाकूर?

**भिकारी.**—(गातां गातां मधेंच थांबतो.)

**हाराण.**—चालूं दे, चालूं दे, थांबूं नकोस. या तुझ्या घोगऱ्या गाण्यानें माझें काळीज अगदीं ठार झालें.

**भिकारी.**—गरीब भिकारी मी, मला कोठलें ह्याहून चांगलें गायाला येणार?

**हाराण.**—तर जा कसा एथून निघून एकदाचा. तुला भिक्षा द्यायला येथें कोण खोळंबला आहे?

**भिकारी.**—महाराज, तुह्मी तर आहांत.

**हाराण.**—मी इकडे आहें हें ठाऊक होतें ह्मणून आलास वाटतें?

**भिकारी.**—तें कांहीं मला ठाऊक नाहीं. तुह्मी राजे लोक.

**हाराण.**—हा मात्र तुझा तर्क खरा. पहाना माझ्या बरोबर चोपदार बरकंदाज वगैरे लोकांचा लवाजमा, व मीही ऐरावतावर बसलों आहें.

आहे. कालीचीं दोन गाणीं ह्मटलीस तर कांहीं मिळेल.

**भिकारी.**—खरें का हें महाराज.

**हाराण.**—तूं का माझा सावकार ह्मणून मी थापा देईन.

**भिकारी.**—बरें बाबा, तुझी मनोवांछा पूर्ण होवो.

(जातो.)

**हाराण.**—माझी एक मनोवांछा आहे. पाहतों तुझ्या आशीर्वादाचा जोर. तिच्या दाराला धक्का देऊन हाका तर मारीन. तोंड उघडलें नाहीं तर हृदय आपोआप उघडेल. कांहीं झालें तरी माझ्या दैवाची परीक्षा पाहीन. ती कांहीं कुलवधू नाही. केवळ गवळ्याची मुलगी. अग सहचरी, सहचरी गे.

( पडद्यांत सहचरी०—कोण हाक मारतें आहे. )

**हाराण.**—म-म-म-मी.

( पडद्यांत ) **सहचरी.**—तूं कोण ?

मी दार उघणार नाहीं.

**हाराण.**—मी एक गिऱ्हाईक आहें.

(पड०) **सहचरी.**—कुठलें गिऱ्हाईक? ह्या वेळीं दार उघडण्याची सोय नाहीं.

**हाराण.**—तुझ्या पायां पडतों, लवकर दार उघड, नाहीं तर कोणी येईल.

(पड०) **सहचरी.**—तुझें नांव काय?

**हाराण.**—माझें नांव, माझें नांव—सहचर.

(पड०) **सहचरी.**—माझी थट्टा करायला आला आहेस वाटतें? जरा थांब तर खरा.

(सहचरी येते.)

**सहचरी.**—कायरे, कोण आहेस रे तूं काळतोंड्या?

**हाराण.**–ए–ए–ए–ग–ग–गवळ्याच्या पोरी, **सहचरी**, मी–मी–मी–**हाराण.**

**सहचरी.**—कां हो, तुह्मी माझ्या नादीं कां लागत आहांत? मी तुमच्या मेहुण्याला जाऊन सांगेन. बड्या माणसाचे तुह्मी संबंधी आणि माझ्या मागें कां?

**हाराण.**—रागावतेस कां? मी कांहीं तुझ्या नादीं नाहीं लागलों.

**सहचरी.**—लागलां नाहीं तर मग इथें ओरडाओरड कां?

**हाराण.**—अगे **सहचरी**, दुसरें कांहीं नाहीं. **मला भोंवळ आली आहे ह्मणून थोडें गोमूत्र पाहिजे.** ह्मणून आलों आहें.

**हाराण.**—अरे राम! तिचें नांव काढूं नकोस. ती घुबडतोंडी ह्मातारी.

**सहचरी.**—तिच्यावर इतका राग कां?

**हाराण.**—ग्रहाचा फेरा, ग्रहाचा फेरा, दुसरें काय?

**सहचरी.**—आतां इथें थांबण्याचें कांहीं कारण नाहीं. आतां घरीं जा.

**हाराण.**—सहचरी, मी तुझ्या पायां पडतों. माझा अनादर करूं नकोस. तुझी गवळी ह्मणजे मोठे दाते. माझ्यावर दया कर, माझ्या तीन कुळांत तुझ्यासारखी कोणी नाहीं.

**सहचरी.**—नीघ लवकर येथून, नाहीं तर डोक्यावर शेण ओतीन.

**हाराण.**—ओत. ओत लवकर, व मला शुद्ध करून घे. ह्मणजे मी प्रायश्चित्त घेतल्यासारखें होईल.

A4

B4

**हाराण.**—दार कां लावलेस? **सहचरी, सहचरी,** मी जर मेलों तर तुला पाप लागेल. हा का तुह्मां गवळ्यांचा धर्म! हे **सहचरी**, एक वेळ दरवाजा उघडून माझ्याशीं दोन शब्द बोलून जा. निदान दोन शिव्या तरी दे. ह्मणजे तुझ्या वचनाचा मला भरंवसा येईल.

(वेणी येतो.)

**वेणी॰**—कोण हाराणबाबू? येथें काय चाललें आहे?

**हाराण.**—कोण?

**वेणी॰**—मला ओळखीत नाहींस का?

**हाराण.**—कोण वेणीबाबू. तुह्मी कोणीकडून?

**वेणी॰**—मी रोगी पहावयाला गेलों होतों. तूं येथें काय करतोस?

**हाराण.**—तेंच तर विसरलों आहें. काय करतों आहें सांग बरें?

**वेणी॰**—हें **सहचरी** गवळणीचें घर ना? तिच्या दाराला धक्के कां देत होतास?

**हाराण.**—काय हें **सहचरीचें** घर! मला वाटलें कीं ही भट्टाचार्यांची पाठशाळा. उद्यां द्वादशी किती घटका आहे हें विचारायला मी आलों होतों.

**वेणी॰**—बरें पण सहचरीच्या नांवानें हाक कां मारलीस?

**हाराण.**—वेणीबाबू, एकूण तुह्मांला कळलें? मेहरबानी करून ही गोष्ट कोणाजवळ बोलूं नका.

**वेणी॰**—का आतां **सहचरीचें** वेड लागलें वाटतें?

**वेणी०**—जा मूर्खा. ती !

**हाराण.**—तें खरें, तिजकडे पाहण्याची देखील माझी इच्छा नाहीं. परंतु परवां दुपारीं विचार करीत बसलों होतों तों इतक्यांत मनाला काय वाटलें कोण जाणे तेव्हांपासून मन स्थिर नाहीं.

**वेणी०**—आतां रात्र पडली. या वेळीं घरीं जा, व हे विचार सोड ह्मणजे मन स्थिर होईल.

**हाराण.**—उं हूं, तें होणें नाहीं. हें बघ वेणीदादा, मला सहाय्य कर. दासी मोलकरणीपेक्षां वरच्या दरज्याच्या स्त्रीवर माझें मनच जात नाहीं.

**वेणी०**—बरें, आज तर ह्या वेळीं जा.

**हाराण.**—जातों. पण आज रात्रीं झोंप यायची नाहीं. वेणीदादा, मला तुझा भरंवसा आहे.

(पहारेवाला व बिहारी येतात.)

**बिहारी.**—बाबा, मला सोड. मला कां थकवतोस?

**पहारे॰**—अरे चल चुपच्याप.

**बिहारी.**—अरे मीं केलें आहे तरी काय? मी पडलों, गडबड कसली! मी मुकाट्यानें चाललों होतों. तर मला व्यर्थ पकडण्यांत तुह्मांला फायदा काय?

**पहारे॰**—आस्ते आस्ते चला जानेकाभी हुकुम नही.

**बिहारी.**—तर मग काय आरडत ओरडत जावें! महाराज थट्टा बस झाली, आतां मला सोडून द्या. चोर वीर धरण्याची कांहीं बहादुरी करा, नाहीं तर त्या गवळीवाड्यांतलें एखादें गुरूं सोडून कोंडवाड्यांत तरी घेऊन जा.

**पहारे॰**—क्या तुम पोलीसके साथ ठट्टा करता है?

**बिहारी.**—न करून काय करूं सांग. असा विनोदाचा सागर व प्राणप्रिय मित्र दुसरा कोण मिळेल?

**पहारे॰**—है कुच तेरे पाकिटमे?

**बिहारी.**—देवाशपथ माझ्या खिशाला यंत्राची एक सुंदर शिवण आहे. हें पहा. जमादारसाहेब मजजवळ सध्यां कांहीं नाहीं. तुह्मी मला सोडा, मी तुमचें भलें करीन.

**पहारे॰**—अरे भला करनेवाला चलो, नही तो दंडा खावगे.

**बिहारी.**—काय, तुह्मी मला ओळखीत नाहीं. मेदिनीपूरचा राजा माझा भाऊ आहे. मुर्शिदाबादचा नबाब माझा

**पहारे०**—खैर ल्वाई.

**बिहारी.**—सरकारचा खजीना मला ठाऊक आहे. पहिल्यांदा दारू विकण्याबद्दल कर, व पुन्हां दारू पिऊन मस्त झाल्याबद्दल कर, मिळून दोन्हीकडून सरकारचा फायदा.

**पहारे०**—चलोगे क्या बको़गे?

**बिहारी.**—तर मग दंड करवणारच?

**पहारे०**—हाँ.

**बिहारी.**—सोडणार नाहीं?

**पहारे०**—नही.

**बिहारी.**—तर मग शिरस्त्याचें काम होऊं द्या. हटा तर मग. येत नाहीं जा. डोली घेऊन या.

**पहारे०**—क्या.

**बिहारी.**—क्या क्या काय. हा पहा येथें बसलों.

**पहारे०**—क्या बदमासी शुरू किया?

**बिहारी.**—डोली घेऊन या. कायद्याप्रमाणें काम करा.

**पहारे०**—ऊठबे ऊठ.

**बिहारी.**—खांद्यावर घ्या, खांद्यावर घ्या.

**पहारे०**—दंडा खावगे?

**बिहारी.**—तो तर खाईनच. तुमच्या हातून कधीं कोणाला लाडू जिलब्या मिळायच्या आहेत!

**पहारे०**—साला बदमाश दारूबाज है! अच्छा साले चल थानामे! ये जोडीदार हो—

( पडद्यांत०—कॉं. )

**पहारे०**—एक साला दारूबाज गीर पडा, जरा आके खडा हो, हम झोला ले आता.

( पडद्यांत०—हाँ, आये आये— )

**बिहारी.**—अरे ए पहारेवाल्याच्या पोरा, दूर हो.

( पळून निघून जातो. )

**पहारे०**—अरे साला भागा भागा! मोडपर कोण है हो, दारूबाज भागा पकडो पकडो.

( जातो. )

**अंक दुसरा समाप्त.**

शान्तेचे ढंग तसे बिनकुल नाहींत. तिच्याजवळ मी कधीं कधीं प्रीतीच्या गोष्टी बोलतें, परंतु तिकडे ती लक्षच देत नाहीं. उलट मला ह्मणते चल, आपण रामायण महाभारतां-तल्या गोष्टी सांगत बसूं ?

**वेणी०**—तें कांहीं नाहीं तें कांहीं नाहीं. स्वतांची स्थिति तिला कळत नाहीं ह्मणूनच ती असें ह्मणते. उपास करून करून शरीराचें तेज गेलें, मन जड झालें. असें नसतें तर अशा वयांत असें रूप असून सर्व उपभोगांचा ती त्याग कां करते ?

**सह०**—डाक्तरसाहेब, हे विचार तुह्मी सोडा. दुसरी कोणी असती तर मीं तिला सहज वश केली असती. पण हिचें नांव काढूं नका.

**वेणी०**—सहचरी, मी व्यसनी ह्मणून कां तिच्या नादीं लागलों आहें असें समजतेस. तसें नाहीं. माझी शान्तेवर

लग्न करीन. विधवाविवाहाच्या गोष्टी मी तिला पुष्कळ सां-गितल्या, तिची पुष्कळ समजूत घातली पण व्यर्थ ! परंतु माझा मात्र प्राण जातो आहे. **शान्ता** जर मिळाली नाहीं तर मी खास मरेन.

**सह०**—ती त्याला काय करणार. डोक्यावर भाऊ आहेना?

**वेणी०**—भावाची काळजी नको. तो तर **पारूल**च्या नादीं पक्का लागला आहे. घरांत काय चाललें आहे ह्याची त्याला वार्ताही नाहीं. **शान्ता** मिळण्याला अडचण पडूं नये ह्मणून तर मीं ही खटपट केली. इतकी खटपट करूनही जर **शान्ता** मिळाली नाहीं तर मी खास मरेन. माझ्या दैवीं स्त्रीसुख कसें तें नाहीं. घरांत काय स्थिति आहे तें तुलाच ह्मणून सांगतों, दुसऱ्यांना सांगून काय फायदा! जेव्हां जेव्हां माझ्या स्त्रीची व माझी गांठ पडते त्या त्या वेळीं भांडणाशिवाय दुसरें बोलणें नाहीं. **दामिनी**ची उग्र मूर्ति दृष्टीस पडली कीं **शान्ता** मिळण्याची इच्छा प्रबल होते. **शान्ता** जर माझी स्त्री झाली तर मी भाग्याचा खरा.

**सह०**—असें जर होतें, तर तिच्याशीं पहिल्यांदाच कां लग्न नाहीं केलेंस? तुमची जात एक, त्यांच्या घराशीं इतका परिचय, शिवाय तुझें तिच्यावर इतकें प्रेम? त्या वेळीं जर तुह्मी ह्मणतां तर सहज होऊन जातें.

**वेणी०**—त्या वेळीं मी लहान होतों, व लज्जेमुळें

सहु०—[illegible] हिलें तर तिला शरीरसुखाची पर्वा नाहीं. तेरा वर्षांची मुलगी विधवा झाली. सासूनें परोपरीनें सांगितलेंन् कीं " बाई तूं अजून लहान आहेस हातांत बांगड्या राहूं देत." त्यावर ती ह्मणाली "नको, आतां कोणाकरितां?" साध्या पातळाशिवाय तर दुसरें कांहीं नेसत नाहीं. खाण्यापिण्यांतही तोच साधेपणा. दशमीच्या दिवशीं एकभुक्तीला दूध मात्र पिते. सासरची इतकी संपत्ति हातीं आहे ह्मणून कांहीं मिजाज आहे का? मोलकरणीबरोबर काम करते.

**वेणी०**—असें आहे ह्मणून तर माझें तिच्यावर इतकें प्रेम. जर ती दिमाखाची व वाईट चालीची असती तर माझें मन तिच्यावर जातें ना. सुंदर चेहऱ्यापेक्षां मिष्ट स्वभाव हा लवकर मन मोहित करितो. शान्ता जर प्राप्त झाली तर माझा सर्व मनस्ताप दूर होईल.

**सह०**—खावीव तर खरी.

**वेणी०**—नको, त्याची जरूर नाहीं. जडीबुट्टीवर माझा भरंवसा नाहीं. त्यानें तर काम बिघडेल. खरोखर तिच्यावर मी फार प्रेम करतों. तिच्या जिवाला जर कांहीं बरेंवाईट झालें तर मला गोड वाटणार नाहीं. तिला भूल देऊन वश करण्याची माझी इच्छा नाहीं. प्रीतीनें वश झाली तर पाहिजे. विधवाविवाहाच्या पुष्कळ गोष्टी मीं तिच्या कानावर घातल्या, परंतु त्यांत स्वतांचा उल्लेख करण्याला संधि मिळाली नाहीं. जर ती मला एकटी भेटली तर तुझ्याकरितां मी किती तळमळतों आहें हें तिला सांगेन. पायां पडून तिची विनंति करीन कीं तुझ्यावांचून माझा प्राण जातो आहे. इतकें झाल्यावर तिचा रुकार मिळणार नाहीं!

**सह०**—हें बघा एक युक्ती सुचली आहे. परंतु फार अवघड आहे. मन होत नाहीं.

**वेणी०**—काय? काय? काय?

**सह०**—छे, तें उपयोगी नाहीं.

**वेणी०**—बोल, बोल. त्यापासून तिच्या शरीराला अपाय नसला तर तेंही करीन.

**सह०**—ती एकटी भेटण्याबद्दल तुह्मी ह्मणाला होतां ना? त्याबद्दल कांहीं ह्मणणार होतें.

**वेणी०**—बरोबर आई असेल ना ?

**सह०**—हो ती असेल. पण तुह्मी मात्र जवळपासच्या एखाद्या बागेंत असा. ह्मणजे बाग वगैरे पाहण्याच्या निमित्तानें मी तिला एकटीला घेऊन येईन. तिच्या मनांत कांहीं पाप नाहीं, मला वाटतें ती खास येईल.

**वेणी०**—जवळची एक बाग माझ्या माहितीची आहे. पण तिला तूं आणूं शकशील का ?

**सह०**—फक्त आणून देईन. तुह्मी मात्र इतकी खबरदारी घेतली पाहिजे कीं माझें अंग ह्या कामांत आहे हें कोणास कळतां नये.

**वेणी०**—तर मग मी एक नवीनच युक्ति काढतों. तूं मात्र तिची व माझी एकांतीं गांठ घालून दे. मी तिचे पाय धरीन. माझ्या अंतःकरणांत काय भडका होऊन राहिला आहे तो तिला दाखवीन. ह्मणजे ती दया करीलच करील.

दिवशीं जाशील त्याच्या आधीं दोन दिवस मला बातमी मात्र दे.

**सह०**—बरें.

(जाते.)

**वेणी०**—तिची समजूत करतां यायची नाहीं? तिचें मन वळवितां यायचें नाहीं? माझी जन्माची इच्छा तृप्त व्हायची नाहीं? एकदां **शान्ता** मिळाली म्हणजे डिस्पेन्सरी वगैरे सर्व सोडून देईन व **अखिला**चे पैसे परत करीन. मग कोणताही वाईट विचार मनांत आणणार नाहीं. मग मला कसली उणीव! असें सुंदर स्त्रीरत्न **शान्ता** व वर इतकी संपत्ति, मग मला काय कमी? **हिरालाल**, अरे **हिरालाल.**

पडद्यांतून हिरालाल:—आलों महाराज.

(हिरालाल येतो.)

**वेणी०**—कायरे, **अखिला**ला शंभर रुपये नेऊन दिलेस का?

**हिरा०**—उद्यां परवांपर्यंत आणखी अडीचशें रुपये त्यांना पाहिजेत. कांहीं सोनें खरेदी करायचें आहे.

**वेणी०**—आईकडून आणखी कांहीं पैसे काढल्याशिवाय चालावयाचें नाहीं. मी तिला सांगेन कीं अखिल शिलकेंतून पैसे घेऊन जातो त्याला मी काय करूं?

**हिरा०**—अशी बातमी ऐकली आहे कीं दवाखाना बंद करण्याचा त्यांचा बेत आहे.

**वेणी०**—अखिल तिकडे लक्ष देत नाहीं. मग व्यर्थ

**तरु०**—नाहीं, मी जाणार नाहीं, तुह्मी मारलें तरी मी जाणार नाहीं. माझी गोष्ट ऐका. घर सोडून बाहेर जाऊं नका.

**अखिल०**—घराबाहेर जाऊं नको तर काय भागूबाई-सारखा घरांतच बसून राहूं?

**तरु०**—नुसत्या बाहेर जाण्याबद्दलचें माझें बोलणें नाहीं. पूर्वीं मीं कधीं मना केलें होतें?

**अखिल०**—मग आतांच काय झालें? मी कोठें जातों?

**तरु०**—कोठें जातां तें आपल्याला माहीत नाहीं, का मला माहीत नाहीं. ज्या दिवशीं आपण पहिल्यांदा गेलां त्याच दिवशीं मला समजलें. जणुं काय कोणीं येऊन माझ्या कानांत सांगितलें. स्त्रियांना ह्या गोष्टी कशा कळतात ह्याची आपणांला कल्पना कशी होईल? पतीच्या जिवाची स्थिति बायकांना पूर्वींच कळते. आपण माझ्या हृदयांत वास करीत आहां. आपल्या मनांत काय तरंग येतात ते मला

मुख, तसेंच आपलें उठणें, बसणें, चालणें या सर्वांत एकदम फेर पडला.

**अखिल०**—जा, जा, वटवट करूं नको. आपल्या कामाला जा.

**तरु०**—ह्याशिवाय माझें दुसरें काम कोणचें? आपलें रक्षण करण्यापेक्षां अधिक महत्वाचें मला दुसरें कोणतें काम आहे?

**अखिल०**—जात कां नाहींस? संसाराचें काम कर.

**तरु०**—संसार! संसार कशाचा! संसार कोणाचा! संसार तर आपला. आपल्याकरितां तर हें सर्व. आपण जर असे वाहवलांत तर कोणाकरितां संसार करावयाचा! ह्या माझ्या चांडाळ पोटाकरितां?

**अखिल०**—फारसें तोंड सोडलेंस. जात कां नाहींस?

**तरु०**—मी हात जोडून विनंति करतें कीं आपण बाहेर जाऊं नका. हे सर्व चाळे सोडा. असें करणें चांगलें नाहीं.

**अखिल०**—चांगलें कोणतें, वाईट कोणतें हें मला समजतें, दुसऱ्यांनीं सांगण्याची मला जरूर नाहीं.

**तरु०**—आपण विद्वान् आहांत, बुद्धिमान् आहांत, इतर सर्व गोष्टींत आपणांला कळतें, पण ह्या कामांत मात्र आपणांला कळत नाहीं. आपल्या सुखाची गोष्ट आपणांला कळत नाहीं.

**अखिल०**—छान कळतें.

**तरु०**—कांहीं समजत नाहीं. आपण कशानें सुखी

अवहेलना करा, मला पायांनीं दूर लोटा, जवळ येऊं देऊं नका, पण परमेश्वरानें बांधलेल्या गांठी सुटायाला या जन्मीं तरी मार्ग नाहीं. आपल्याजवळ पदर पसरून एवढें चुडेदान मागतें. एवढी भिक्षा मला घालाच.

**अखिल०**—ह्या सर्व गोष्टी तुझ्याजवळ बोलण्याचा उपयोग नाहीं, व मी बोलणार नव्हतोंही, पण आतां माझा दोष नाहीं. तूंच मला बोलायला भाग पाडलेंस. हें पहा, तुझ्याशीं लग्न झाल्यानें माझा सर्वस्वी नाश झाला. माझें जीवित स्नेहशून्य झालें. शेंकडों पुस्तकें वाचून प्रणयाची जी माझी कल्पना झाली होती ती सर्व जळून खाक् झाली. प्रणयाच्या आशेनें मी वेड्यासारखा हिंडलों. हें पहा, ज्याच्या जवळ जाण्यानें मी सुखी होईन, ज्याच्या संगतीनें चित्ताला शांति मिळेल, अशी वस्तु मला मिळाली असतां तिचा त्याग मी कसा करीन?

**अखिल०**—सर्वस्वी नाहीं तरी थोडीबहुत मिळाली. थोडे दिवसांनीं घरादाराची व्यवस्था लावल्यावर मग पूर्ण प्रकारची शांति मिळेल.

**तरु०**—मला ठाऊक आहे, आपणांला कधींही मिळाली नाहीं व कोठेंही मिळणार नाहीं.

**अखिल०**—काय ह्मणतेस मिळाली नाहीं व मिळणारही नाहीं ? हें कशावरून ?

**तरु०**—सगळ्यावरून.

**अखिल०**—सगळे कोण ?

**तरु०**—आपले नेत्र, आपला चेहरा, आपले दीर्घ निश्वास, सदा अन्य विषयाचें चिंतन, खाण्यावर अरुचि, सर्व गोष्टींची विरक्ति, बुकें आपणांला इतकीं प्रिय पण आलीकडे त्यांचें दर्शन नाहीं, माझ्यावर आपली प्रीति नाहीं, नसो, मला जवळ येऊं देत नाहीं, नका येऊं देऊं, पण आपली स्थिति पूर्वीची राहिली नाहीं. असें असून आपण ह्मणतां कीं मी सुखी आहें, मला शांति मिळाली, परंतु मला हें खरें वाटत नाहीं. माझी गोष्ट ऐका, मी आपली स्त्री; पुरुषांना कशानें सुख होईल हें बायकांना चांगलें समजतें. पण आपण जेथें सुख मिळेल असें समजतां तेथें मात्र तें खास मिळणार नाहीं, कोणाला मिळालें नाहीं व पुढेंही मिळणार नाहीं. जें मुळाशींच चुकीचें त्यापासून कसें सुख व्हावें? स्त्रियांचा प्राण एकच ना, तो त्यांनीं कोणाकोणाला ह्मणून द्यावा ? मग विधवांचें लग्न कां होत नाहीं ? प्राण कायतो

गोष्टी तूं ऐकल्या आहेस त्यावरून हें तुझें ह्मणणें आहे. मी जिची गोष्ट सांगतों आहें, तिची योग्यता तुला माहीत नाहीं. दुर्दैवानें ती वेश्येच्या घरांत जन्माला आली आहे इतकेंच. बाकी तिच्या ठिकाणीं प्रणय पूर्ण भरला आहे. ती मला ह्मणाली कीं केवळ आईच्या मर्जीखातर मी इतरांना घरांत येऊं देतें, तुमच्याशिवाय माझें कोणावरही प्रेम नाहीं. आई जर नसती तर मी आपल्याजवळून पैसेही घेतले नसते.

**तरु०**—आपलें शिकणें संवरणें कोणीकडे गेलें? एवढें आपल्याला कळेना कीं प्राण ह्मणजे तिचा विक्रीचा माल, ती जर असें बोलली नाहीं तर तिला गिऱ्हाईक कसें मिळेल? हलवाई नाहींका ह्मणत महाराज, ही मिठाई आपणाकरतांच तयार केली आहे. सर्व गिऱ्हाइकांशीं त्यांची हीच भाषा.

**अखिल०**—त्यांतलें इंगित तुला कळायाचें नाहीं. तूं

**तरु०**—तें मला समजत नाहीं. आपली इतकी विद्या, व आपलें असें सच्छील असूनही आपणांला भूल कां पडावी? माझा सर्वस्वी घात करायला व आपल्याला वश करायलाच ती लिहिणें वाचणें शिकली.

**अखिल०**—कळायच्या वेळीं मला हें कळेल. आतां मला उशीर झाला मी जातों.

**तरु०**—जाऊं नका. माझी आणखी एक गोष्ट ऐका. माझ्यावर जर आपली प्रीति जडत नसेल तर मला दूर लोटा, व आपली जशी इच्छा आहे त्या प्रकारची सुंदर व शिकलेली, अशी वधू पसंत करून तिच्याशीं लग्न लावा. प्रथम प्रथम सासूबाई जेव्हां जेव्हां आपल्याला लग्नाविषयीं उपदेश करीत त्या त्या वेळीं आपण ह्मणत होतां कीं "आई, मला त्रास देऊं नकोस. सवतीसवतीच्या भांडणाचा देखावा पाहण्याचा मजवर प्रसंग आणूं नकोस." पण मी विनंति करतें व हात जोडून आर्जव करितें कीं आपण आतां विवाह करा, त्या पिशाच्चिनीची संगत सोडा, संसारी व्हा, सुखी व्हा, आपलें शरीर सांभाळा; एवढी माझी प्रार्थना ऐकाच. मी आपली दासी आहें. तिच्यावर मी बहिणीप्रमाणें प्रेम करीन. दासी-प्रमाणें तिची सेवा करण्याला जरी आपण सांगितलें तरी करीन. तर आपण सुखी व्हा व मामंजींचा संसार राखा.

**अखिल०**—आज तूं मुद्दाम भांडण उकरून काढलें आहेस असें मला वाटतें. मीं सर्व ऐकलें. दूर हो. आतां मी जातों.

**तरु०**—नाहीं, मी सोडणार नाहीं, आपण कशानें सुखी व्हाल तें मला सांगा, मी करीन. अमकें लुगडें नेस ह्मणून मला सांगाल तर तेंच नेसेन. अमक्या तऱ्हेची वेणी घाल ह्मणून सांगाल तर तशी घालीन. अमका पदार्थ खा ह्मणून सांगाल तर तोच खाईन. मी रात्रभर जागी राहून आपले पाय चेपीत राहीन. आपण सांगाल तें करीन. पण आपण मात्र घरांत रहा बाहेर जाऊं नका.

**अखिल०**—काय हा त्रास?

**तरु०**—मजकडे एकदां पहा, चांगलें लक्ष देऊन पहा ह्मणजे माझ्या अंतःकरणाची स्थिति काय आहे हें आपणांस कळेल. पहा, पहा, मी कांहीं अगदीं कुरूप नाहीं, आणि यदा कदाचित् असलें तर मी आपली दासी ना? दासीवर रागावणें आपल्याला योग्य का?

**अखिल०**—सोडीत नाहींस का?

**तरु०**—मी पायांवर लोटांगण घेईन.

**अखिल०**—तर मग मुकाट्यानें तूं नाहींच सोडीत? मग मीं जर कांहीं केलें तर त्याचा दोष मजकडे नाहीं.

**तरु०**—दोष कसला?

**अखिल०**—अजूनही गोडीनें सांगतों आहें, सोड मुकाट्यानें.

**तरु०**—तिचे पुष्कळ प्रणयी आहेत, पण मला आपल्यावांचून कोण आहे? मला कोणाच्या हातीं देऊन जातां?

**अखिल०**—काय ह्मणतेस? तिचे पुष्कळ आहेत. फार जीभ चुरुचुरु करायला लागली. हो तर मग दूर.

(लाथ मारतो.)

**तरु०**—(स्थिर होऊन) मला लाथ मारली, चांगलें केलेंत. मी आपली स्त्री, आपली दासी, मला आपण काय वाटेल तें कराल. बसा, जाऊं नका असें मीं ह्मटलें व आपले पाय धरिले. मला लाथ मारण्याचा आपल्याला अधिकार आहे, हें मला कबूल आहे. कारण मी आपली स्त्री. दुसरी कोणी असती तर आपण लाथ मारतां ना. स्त्री आहे ह्मणून मला सर्व सोसलेंच पाहिजे. लाथ मारलीत, आतां एकदां प्रेमानें जवळ घ्या. पति स्त्रीची अवहेलनाही करतो व प्रीतिही करितो. आजपर्यंत आपण माझी पुष्कळ अवहेलना केली, आतां एक वेळ प्रेम करा. प्रेम करणें नसेल तर निदान माझी विनंति तरी ऐका व मला आपली सेवा करूंद्या.

केळें नाहींस तर मी कोणाचा धांवा करूं? मी कोठें जाऊं? माझे पति अज्ञानानें दु:खांत पडले आहेत त्यांचें रक्षण केल्याशिवाय मी कोठें जाऊं? मी जर मेलें तर त्यांच्याबद्दल कोण काळजी करील? त्यांना दु:खांतून बाहेर काढण्याचा कोण प्रयत्न करील?

( शान्ता येते. )

**शान्ता.**—कांगे वहिनी, दादा गेला वाटतें?

**तरु०**—वन्सं, माझा घात झाला. कोणा चांडाळानें माझ्या सुखांत माती कालविली.

**शान्ता.**—आज झालें आहे काय तुला. दादा कांहीं बोलला कीं काय?

**तरु०**—कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. त्यांचें कसें होईल याचा मी विचार करीत होतें.

**तरु०**—सासूबाई रडताहेत? माझ्याचकरितां त्यांना हें दुःख! बरें तर चला.

(दोघी जातात.)

---

## तृतीयगर्भांक.

### वेणीमाधवाचें घर.

**वेणीमाधव व दामिनी.**

**वेणी०**—स्थिरो भव, स्थिरो भव, एक दिवस तरी तुझा संताप आवर. जरा थंड हो.

**दामिनी.**—मी थंडच आहें. आपल्यासारख्याशीं ह्याहून थंड राहून चालावयाचें नाहीं.

**वेणी०**—हा जर तुझा थंडपणा, तर तुझ्या गरमपणाची मला कल्पना करतां येत नाहीं.

**दामिनी.**—दुसरीशी कोणी असती तर समजतें. मी आपली बिचारी गप्प बसतें ह्मणूनच आपण मला इतकें सळो कां पळो करितां.

**वेणी०**—बरें इतकें रागावायला तुला झालें आहे तरी काय? पैशाबिशाची कांहीं अडचण उरली नाहीं, व आपलें चांगलें चाललें आहे. मग मुद्दाम तूं भांडण उकरून कां काढतेस?

**दामिनी.**—पैशाचें सुख मला काय आहे हें दिसतेंच

**दामिनी.**—बरं, औषधाला आली होती, तर अर्धा तास एकांतांत बसून तिच्याशीं फिदी फिदी हंसत कां होतां?

**वेणी॰**—एकांतांत आणि फिदीफिदी. मला वाटतें हें काम नोकराचेंच. त्यानेंच येऊन फोडलें असेल.

**दामिनी.**—फोडायचें काय? पण त्या बिचाऱ्यावर कां राग. मला बातमी देणारें माझें कोणी दुसरें मनुष्य नाहीं कीं काय?

**वेणी॰**—मग त्यांत गुप्त काय आहे. डाक्तराला रोग्याशीं एकांतांत कांहीं काम नसतें का? सर्व रोगाची हकीकत सर्वांच्या समोर सांगतां येते का?

**दामिनी.**—सहचरीच्या रोगाची हकीकत नव्हे, आपल्या रोगाची. शान्तेचें नांव कशाला निघालें होतें मग?

**वेणी॰**—काय, काय, शान्तेचें नांव? तिचें नांव कोणीं सांगितलें. नोकर बेटा मोठा पाजी आहे.

A4

B4

सांगितलें असेल. "बाईसाहेब, बाबू ह्मणाले मी जगणार नाहीं. शान्तेची गोष्ट निघाली होती व नंतर ह्रिरूबरोबर दवाखाना बंद करण्याचाही विचार ठरला." असेंच कीं नाहीं?

**वेणी०**—हं हं, त्याचें काय. अखिल उगीच पैसे उडवितो ह्मणून दवाखाना बंद करण्याचा त्याच्या आईचाच विचार आहे.

**दामिनी०**—तें तर मागेंच ठरलें आहे. त्यांत शान्ता कशाला आली होती? शिवाय दवाखाना ठेवायचा किंवा नाहीं त्यांत सहचरीचा काय संबंध? नोकर कदाचित् मूर्ख असेल, पण मी तर मूर्ख नाहीं ना? ती नीच गवळण तर पक्की अट्टल. तिच्या मार्फत शान्तेला वळविण्याचा विचार चालला आहे. ह्मणून तर शान्तेबद्दल इतका कळवळा, व तिचें पुन्हा लग्न करविण्याचा विचार. विचाराविचारांत तिच्या सौंदर्याच्या, व वयाच्या गोष्टी. खरेंच सांगा तिचें सौंदर्य व रूप हीं आपल्या मनांत भरलीं आहेत कीं नाहींत?

**वेणी०**—छान. छान समजलें. रात्रंदिवस तूं मजबरोबर भांडतेस त्यावरून मला वाटे कीं तुझी मजवर प्रीति नाहीं. परंतु तो माझा गैरसमज आज दूर झाला. या तुझ्या भाषणावरून मला दिसतें कीं तूं मजवर फार प्रेम करतेस. तर हे प्रियतमे, प्राणवल्लभे! तुझा मजवरचा राग हा आपला वरकरणीचा. अंतर्यामीं मजवर प्रेम आहे. असेंच ना?

**दामिनी.**—आपला कावा समजला, समजला. आपल्या कावेबाजपणाच्या भाषणानें मी फसावयाची नाहीं. मी

**दामिनी.**—बरें, औषधाला आली होती, तर अर्धा तास एकांतांत बसून तिच्याशीं फिदी फिदी हंसत कां होतां?

**वेणी॰**—एकांतांत आणि फिदीफिदी. मला वाटतें हें काम नोकराचेंच. त्यानेंच येऊन फोडलें असेल.

**दामिनी.**—फोडायचें काय? पण त्या बिचाऱ्यावर कां राग. मला बातमी देणारें माझें कोणी दुसरें मनुष्य नाहीं कीं काय?

**वेणी॰**—मग त्यांत गुप्त काय आहे. डाक्तराला रोग्याशीं एकांतांत कांहीं काम नसतें का? सर्व रोगाची हकीकत सर्वांच्या समोर सांगतां येते का?

**दामिनी.**—सहचरीच्या रोगाची हकीकत नव्हे, आपल्या रोगाची. शान्तेचें नांव कशाला निघालें होतें मग?

**वेणी॰**—काय, काय, शान्तेचें नांव? तिचें नांव कोणीं सांगितलें. नोकर बेटा मोठा पाजी आहे.

सांगितलें असेल. "बाईसाहेब, बाबू ह्मणाले मी जगणार नाहीं. शान्तेची गोष्ट निघाली होती व नंतर ह्रिखबरोबर दवाखाना बंद करण्याचाही विचार ठरला." असेंच कीं नाहीं?

**वेणी०**—हं हं, त्याचें काय. अखिल उगीच पैसे उड-वितो ह्मणून दवाखाना बंद करण्याचा त्याच्या आईचाच विचार आहे.

**दामिनी०**—तें तर मागेंच ठरलें आहे. त्यांत शान्ता कशाला आली होती? शिवाय दवाखाना ठेवायचा किंवा नाहीं त्यांत सहचरीचा काय संबंध? नोकर कदाचित् मूर्ख असेल, पण मी तर मूर्ख नाहीं ना? ती नीच गवळण तर पक्की अट्टल. तिच्या मार्फत शान्तेला वळविण्याचा विचार चालला आहे. ह्मणून तर शान्तेबद्दल इतका कळवळा, व तिचें पुन्हा लग्न करविण्याचा विचार. विचाराविचारांत तिच्या सौंदर्याच्या, व वयाच्या गोष्टी. खरेंच सांगा तिचें सौं-दर्य व रूप हीं आपल्या मनांत भरलीं आहेत कीं नाहींत?

**वेणी०**—छान. छान समजलें. रात्रंदिवस तूं मजबरो-बर भांडतेस त्यावरून मला वाटे कीं तुझी मजवर प्रीति नाहीं. परंतु तो माझा गैरसमज आज दूर झाला. या तुझ्या भाषणावरून मला दिसतें कीं तूं मजवर फार प्रेम करतेस. तर हे प्रियतमे, प्राणवल्लभे! तुझा मजवरचा राग हा आ-पला वरकरणीचा. अंतर्यामीं मजवर प्रेम आहे. असेंच ना?

**दामिनी.**—आपला कावा समजला, समजला. आपल्या कावेबाजपणाच्या भाषणानें मी फसावयाची नाहीं. मी

त्याला तें घरच वर्ज होईल. दवाखानाबिवाखाना सर्व बंद करा. मग पाहीन शान्तेकरितां प्राण जातो कीं अन्नाकरितां जातो.

**वेणी०**—त्या घरीं जाणें बंद ? दवाखाना बंद ? मग खायचें काय ?

**दामिनी.**—मला एकटीलाच नाहीं भूक लागायची. माझ्याबरोबर आपणांलाही उपाशीं राहवें लागेल. बरें तर आपण दोघेही उपास करून मरूं.

**वेणी०**— तूं खरी पतिव्रता. पतीबरोबर उपास करून मरून, सहगमनाचा तुझा विचार दिसतो.

**दामिनी.**—मी पतिव्रता आहें कीं नाहीं हें एक परमेश्वराला माहीत. माझें आचरणच सांगेल. मी आपल्याकडून किती व्यवस्थेनें व काटकसरीनें संसार करतें, व किती कष्ट सोसतें, परंतु ह्यांना काय त्याचें. हे आपले कांहीं ना कांहीं तरी करून भांडण उकरून काढून मला त्रास देत असतात.

**वेणी०**—काय, तुला त्रास देतों, व उगाच कांहीं तरी निमित्त काढून भांडतों ?

**दामिनी.**—त्या मेल्या शान्तेला तरी काय अक्कल आहे ? एकीकडे पहावें तों तोंडांतून शब्द नाहीं व दुसरीकडे मनांत हें कपट. वरून अगदीं गाय पण अंतर्यामीं मात्र अगदीं निर्दय. जसा कांहीं राखेंत झांकलेला निखारा.

**दामिनी.**—तरीच ह्मटलें आपल्या काळजाला कां इतकें झोंबलें तें. आपल्याला फार जखम झाली. मला वाटलें ह्मणून शिव्या दिल्या. त्या दुष्टेनें माझा सर्वस्वीं नाश केला, आणि मीं मात्र बोलूं नये. अवदसा कोठली!

**वेणी०**—चालूं दे तर मग. शिव्या देऊन जर तुझें समाधान होत असेल तर खुशाल दे. मी तोंपर्यंत बाहेरून हिंडून येतों.

**दामिनी०**—मला वाटलें तर देईन, नाहीं तर नाहीं देणार. द्वाड! बेशरम!

**वेणी०**—वात्रट, पाजी, मूर्ख,—

**दामिनी.**—निलाजरी,—

**वेणी०**—राक्षशीण, हडळ,—

**दामिनी.**—काय! मला शिव्या देतां? शान्तेकरतां मला शिव्या द्यायला आलां आहांत कीं काय?

**वेणी०**—देवाचें नांव! तुला शिव्या! तुला मी कशा शिव्या देईन? शिव्या देतां देतां तुझें तोंड दुखूं लागलें व घसा कोरडा पडला व तुला आठवेनात ह्मणून मी तुला मदत केली.

**दामिनी.**—आपल्याजवळ नकोत मला शिव्या शिकायला.

**वेणी०**—बेअदबी माफ व्हावी. तुझा प्रभाव मला पूर्ण माहीत आहे.

ळाली नाहीं, ह्मणून माझे घर बुडवायला आली, पाजी पाकिटा.

**वेणी०**—कजाग, नतद्रष्ट, नाहीं नाहीं चुकलों, चालूं दे चालूं दे. तोंडाला खळ पडूं देऊं नकोस.

(पडद्यांत पहारेवालाः—बाबू ! डाक्टर साहेब ! )

**वेणी०**—ए गप्प रहा. कोण आहे ?

(पडद्यांत) **पहारे०**—लवकर चला, हेमबाबूच्या घरचें बोलावणें आलें आहे. मुलाला खोकला फार झाला आहे. मनुष्य बाहेर उभा आहे.



**वेणी०**—देवानें खैर केली, त्यानें आपली कृपादृष्टि मजकडे फिरविली ह्मणून बरें झालें. नाहीं तर माझी आज धडगत नव्हती.

(पडद्यांत) पहारे०—काय जबाब सांगूं?

**वेणी०**—तूं जा. मी आलोंच. हे मधुरभाषिणी, आतां भांडीं, उतरंडी, चूल, सूप टोपलीं वगैरेंवर आपला सर्व राग काढून घे. बिचाऱ्या वेणीकरितां अगदीं बाकी ठेवूं नकोस. मी आतां जातों.

(जातो.)

**दामिनी.**—जगांतले सर्व लोक मेले कीं काय ह्मणून ह्या अवदसेला माझाच नवरा सांपडला ? टवळी माझ्या छातीवर बसूं पाहते आहे. ढोंग पहा मेलीचें. धर्म करते आहे आपल्या डोंबलाचा. धरमतला घांटावर नेऊन तिला गाडली पाहिजे. हिच्या धर्माचरणाच्या गोष्टी पुन्हा माझ्या कानावर तर येऊं देत ह्मणजे पहा मी कसा डांगोरा पिटवितें ती.

(जाते.)

---

# पारूलचें घर.

पारूल, अखिल, हेना, किसमिस व बिहारी.

**किसमिस व हेना.**—

( अर्धतनू वारुळीं बुडाली या चालीवर. )

सुफलाशेनें रुचिर लाविला प्रीतितरू या करीं ॥
जाहली पूर्ण निराशा परी ! ॥ ध्रु० ॥
सौजन्याचें कुंपण त्यातें प्रेमभरें घालुनी
रक्षिलें विरहपशूपासुनी ।
आस्थेचें त्या अळें करोनी, अश्रुजलें सिंचुनी
घातलें हृदयसार साजणी । चाल—
परि सहसा वन्या लता
उगवुनि, दावि मला क्रूरता
कवळुनि माझा प्रिय तरु बाई नाश तयाचा करी॥१॥

**बिहारी.**—वाः काय छान! किती उत्तम! हा राग कल्याण का भिवंडी. किसमिसचा आवाज जसा गोड आहे तशीच हेनाच्याही आवाजांत एक प्रकारची माधुरी आहे.

**हेना.**—चल. निघ येथून. आमच्याशीं लघळपणा करायला कां आलास!

**बिहारी.**—आपली तारीफ करायला. दुसरें काय? माझ्या बोलण्याचा आपल्याला राग आला कीं काय? आतां थोडा घसा ओला करा. तोंड अगदीं सुकून गेलें आहे.

**हेना.**—पहा हो, हा बिहारी कशाला आमच्यामध्यें येऊन पडला.

पडलों आहें कोठें? Go on चल, चल, लवकर. एक घोटभर घेऊन टाक. 'como Kismis.'

**किसमिस.**—चल ग हेना, आपण आपल्या घरीं जाऊं.

**विहारी.**—एखादें बिस्कुट तरी खाऊन जा.

**पारूल.**—त्यांची खाण्याची इच्छा नाहीं. मग त्यांना कां उगाच आग्रह. तुह्मांला वाटलें तर तुह्मी खा. बायांनो, तुह्मी बसा हो.

**हेना.**—येऊन बराच वेळ झाला, आतां गेलें पाहिजे.

**विहारी.**—नका बसूं, नका बसूं. अखिलबाबू, एक वेळ पद्यरचनेची धाटणी तर पहा. तुझ्या संगतीनें मी देखील हळू हळू कवि झालों आहें.

**हेना.**—चल ग किसमिस, आपण जाऊंच.

**पारूल.**—थोडें बसा बसा, बैस ग किसी.

**हेना.**—नको आतां. उद्यां येईन. घर मोकळें सोडून आलों आहोंत.

**पारूल.**—तर मग आणखी एक चीज गाऊन जा.

**हेना.**—नको आतां आग्रह, माझा आवाज आज साफ नाहीं.

**अखिल.**—नाहीं, नाहीं, आपला आवाज फार मधुर आहे.

**पारूल.**—एकदा आवाज साफ कर, व गाच एक चीज. तुझें गाणें ऐकण्याची बाबूंची फार इच्छा आहे.

**हेना.**—तुझ्या घरीं आह्मी आलों आहोंत. तर तूंच गा.

( दावुनि धनलोभ भला या चालीवर. )

शिव ! शिव ! हा जीव सखे फार तळमळे ।
परिणामा नेणुनि ज्यां हृदय अर्पिलें ॥ ध्रु० ॥
तुजवर मत्प्रीति सखे नाथ बोलले ।
प्रेमपाशिं गुंतवुनी हृदय वंचिलें ।
कपटी ते, ज्ञात तदा मज न जाहलें ।
तद्विरहें आज परी रडत बैसलें ॥ १ ॥ शिव०

आतां तुह्मी गा.

**किसमिस.**—हें बघ हेना, मग चटकर एक चीज गाऊन टाकीनास?

**हेना.**—काय गाऊं ?

**अखिल.**—प्रीतिविषयक एखादी चीज होऊं द्या ?

**बिहारी.**—नशीब ह्मणून अखिलबाबूंनीं प्रणयाची चीज ह्मणायला सांगितली, नाहीं तर ह्यांनीं प्रार्थनासंगीतांतली एखादी चीज सुचविली असती.

**किसमिस.**—आह्मी तुह्मांला काका मानतों मग तुमचा थट्टा करण्याचा काय संबंध?

**बिहारी.**—पुतणीचा संबंध. तूं आमची डिअर मिस् किसमिस.

**हेना.**—पुरे कर ग. त्यांच्याशीं तोंड द्यायला तूं पुरे का पडशील. आटप लौकर, एक चीज ह्मण व मग आपण जाऊं.

( किति कपटि असिस या चालीवर. )

चल विविध गोड करूं केलि ॥ ध्रु० ॥

एकांतीं निज हितगुज बोलूं वृत्ति अधीरचि झाली ॥ १ ॥ च०

परस्परांतें भेटूं प्रीती मोह मना बहु घाली ॥ २ ॥ च०

**बिहारी.**—वाहवा! इतका गोड आवाज! आणि हाणत होत्या कीं आमचा आवाज बसला आहे ह्मणून. समजलां कां, तुह्मी कधीं कधीं आपला आवाज उन्हांत वाळत टाकीत जा, नाहीं तर त्याला मुंग्या लागतील.

**अखिल.**—ओ म्युझिक्, म्युझिक्, म्युझिक इज् धी फुड आफ लव्ह. (O music, music! music is the food of love.)

**बिहारी.**—ह्याचा मराठींत काय अर्थ? गाणें ह्मणजे प्रीतीचें अन्न. असेंचना? हें आतां खाणें झालें. आतां कांहीं पिणें पाहिजे.

**अखिल.**—ह्या वेळीं माझ्या समोर? असें जर करशील तर मी तुला मुळींच आणून देणार नाहीं.

**बिहारी.**—रागावतोस कां? ब्रांडी ह्मणजे प्रीतीचा गरम मसाला. घोट दोन घोट घेतल्याशिवाय का प्रीतीला रंग चढेल! थोडी घेच ह्मणजे चोंहोकडे पवित्र प्रणयाचा घमघमाट सुटेल.

**पारूल.**—बाबूंना जर असा त्रास दिलास तर ते बाटली घेऊन जातील.

**हेना.**—आह्मी आतां जातों.

**पारूल.**—बसाना थोड्या.

**हेना.**—नको आतां, आई रागवेल.

**पारूल.**—मग काय ह्मणायचें? **किसी** सुद्धां चालली का?

**किसमिस.**—हो, आज जातें आतां.

**बिहारी.**—**किस्मिस्** कां जाते? तिचें कोण आहे रागवायला? मनुकामावशी कीं काय?

**किसमिस.**—पहा ह्याचे हे श्लेष. चल, हेना चल, बाबूसाहेब, जातों आह्मी.

( किस्मिस् व हेना जातात. )

**अखिल.**—ह्या तरी किती सभ्य आहेत. गातात सुद्धां किती सुंदर, गाणें ऐकून मनाला किती आराम वाटला. घरांतून निघाल्यापासून मन किती तरी उद्विग्न झालें होतें.

**पारूल.**—कारण काय बाबूसाहेब. कशामुळें मन उद्विग्न झालें होतें? येथें आल्यानें आपल्या मनाला कांहीं वाईट वाटतें कीं काय?

**अखिल.**—तसें नव्हे. जोंपर्यंत तुजजवळ असतों तोंपर्यंतच काय तो मनाला आराम वाटतो. परंतु आज एक हातून पूर्वी कधीं न घडलेला असा अन्याय घडला.

**पारूल.**—असा अन्याय तरी कोणचा. सांगा तर खरें?

**अखिल॰**—आज येतांना, जिला माझी बायको ह्मणतात तिला एक लाथ मारून आलों. माझी तिजवर प्रीति

स्त्रियांच्या अंगावर हात टाकणें ह्मणजे मोठा अन्याय.

**बिहारी.**—तरी पण तूं शास्त्राज्ञा उलंघन नाहींच केलीस. हात टाकूं नये ह्मणून लाथ मारलीस.

**अखिल०**—थट्टा नाहीं. खरोखरच माझें मन मला खात आहे.

**पारूल.**—तर मग आपली तिच्यावर फार प्रीति आहे. तसें नसतें तर आपल्याला इतकें वाईट वाटतें ना.

**अखिल०**—नाहीं, तसें नव्हे. माझ्या वर विश्वास ठेव. तुझ्या शिवाय या जगांत माझें दुसऱ्या कोणावरही प्रेम नाहीं. तरीही पण तिला मारलें हें चांगलें केलें नाहीं.

**बिहारी.**—इतकें शौर्य दाखविण्याचें कारण तरी काय पडलें?

**अखिल०**—अलिकडे तिचें फारच तोंड सुटलें आहे. रात्रंदिवस मला तिचा त्रास असतो. आज बाहेर जायला निघालों त्या वेळीं तिनें मला गांठलें व आपलें चऱ्हाट सुरू केलें. दूर हो ह्मणून दहादां सांगितलें पण व्यर्थ. उलट तिनें माझे दोन्ही पाय घट्ट धरले. त्या वेळीं **पारूल**ला भेटण्याची मला घाई झाली होती व मनही उतावीळ झालें होतें. आणि अशा वेळीं तिचें चऱ्हाट. मला ह्मणाली **पारूल**ला पुष्कळ दोस्त आहेत. असें बोलल्यावर मग सहजच राग येईल कीं नाहीं?

**पारूल.**—विवाहित स्त्रिया ह्मणजे आमचे शत्रू. आपलें जर लग्न झालें नसतें तर—

**बिहारी.**—दुर्दैव तुझ्या आईबापांचें कीं असली कु-लीन कुमारी त्यांना सांपडली नाहीं!

**अखिल०**—तुला कायतो एक कुलीनपणा ठाऊक आहे. पवित्र प्रणयाचें रहस्य तुला समजलें नाहीं. **पा**रूलच माझी खरी स्त्री. माझें जें लग्न झालें आहे तें माझें दुर्दैव, दुसरें काय?

**बिहारी.**—यांत काय संशय. लग्न ह्मणजे मोठेंच दुर्दैव. बरें, हें तर सांग, जर घरच्या स्त्रीनें पवित्र प्रणयाकरितां एखादा पति पसंत केला तर चांगलें का?

**अखिल०**—तिला जर पवित्र प्रणय कळता तर तिचा मीं कां त्याग केला असता? तिला प्रीतीची कल्पनाही नाहीं. पाय चेपणें, सेवा करणें, स्वयंपाक करणें, हींच तिला प्रेमाचीं लक्षणें वाटतात.

**बिहारी.**—आणि पडून पडून लाथाही खाते. ढाल तरवार हातीं घ्यावी, पाय दुखतात असें ढोंग करून उगाच धरून बसावेंत, नुसतें एक पेलाभर पाणी आणलें तरी श्रम झाल्यासारखें दाखवावें, व घरांत कोणालाही मज्जाव नसावा, हीं पवित्र प्रणयाचीं लक्षणें!

**पारूल.**—दारू घ्यायची तर पी. पण ही बडबड काय ह्मणून? तुला स्वस्त्रीच्या प्रीतीचा अनुभव आहे तो तुझा तुलाच लखलाभ होवो.

**बिहारी.**—मग काय करावें सांग? बाबांनीं एक चिर-कालची दासी करून दिली आहे. तिच्याशीं अपवित्र प्रणय

**अखिल०**—बरें, **पारूल** तुझी मजवर किती प्रीति आहे?

**पारूल.**—किती प्रीति आहे तें काय सांगतां येईल? ज्या प्रीतीला परिमाण आहे ती कुचकामाची.

**अखिल०**—विहारी, ऐक, ऐक.

**विहारी.**—तूंच ऐक हें, मी आजच नाहीं ऐकत. फार पूर्वीपासून ऐकतों आहें.

**अखिल०**—**पारूल**, जर मला पैसे देण्याची ऐपत नसती तरी देखील तुझी मजवर इतकी प्रीति असती का?

**पारूल०**—आपला मजवर विश्वास बसणार नाहीं हें मला माहीत आहे. दुर्दैवानें वेश्येच्या घरांत माझा जन्म झाला आहे. आपण पैसे दिले नाहींत तर उपाय नाहीं. पण पैशाशिवाय कसें चालणार? दागिन्याबिगिन्यांची मला जरूर नाहीं, पण आईला समजत नाहीं, त्याला मी काय करूं? मला नेहमीं अशी भीति वाटते कीं आपण माझा त्याग कराल. आपण पुरुष पडलां. पुरुषांचें मन काय सदा एक जागींच राहील?

**अखिल०**—नाहीं बरें **पारूल**. मी काय लंपट आहें ह्मणून दुसऱ्या स्त्रीवर माझें प्रेम जडेल? प्रणयाकरितां मी वेडा झालों होतों. पण तुझी गांठ पडली ह्मणून माझी इच्छा तृप्त झाली. तुला सोडून मी कोठें जाऊं?

**पारूल.**—दुसऱ्या कोठें नका जाऊं पण घरची स्त्री तर आहे ना? खरें सांगा चिरकाल का तुह्मी स्त्रीचा त्याग

**अखिल०**—**पारूल**, माझ्या दृष्टीनें ती परस्त्रीच. मी तुला एकदां सांगतों, तुझ्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं, मी व्यभिचारी नाहीं, लंपट नाहीं, तुला सोडून तिच्याकडे जरी गेलों तरी देखील मीं व्यभिचार केलासा होईल.

**बिहारी.**—बाबारे, तुझ्यासारखें धर्मज्ञान मीं कोठेंच पाहिलें नाहीं. स्वस्त्रीसंसर्गासारखा दुसरा व्यभिचारच नाहीं! तूं ह्मणतोस तेंच खरें. सकाळीं घरीं गेलास ह्मणजे तिला एका भाड्याच्या घरांत नेऊन ठेव. परस्त्रीला कोणी घरांत ठेवतें का? **पारूलला** घरीं घेऊन जा ह्मणजे ती तुझ्या आईकरितां फराळाचें करीत जाईल.

**अखिल०**—**पारूल** स्वयंपाक करील?

**बिहारी.**—चूक झाली, चूक झाली, स्वयंपाकघरांत गेलें कीं प्रणयभंग झालाच. प्रणय ह्मणजे कांचेची वस्तु, जरा आंच लागली कीं तडकलीच.

(वामा येते.)

**वामा.**—एक गोष्ट सांगायला आलें आहें. जर कांहीं मनांत न आणाल तर सांगतें.

**अखिल०**—काय आहे? सांगा तर खऱ्या.

**वामा.**—नाहीं सांगत. तुह्मी ह्मणाल कीं ही थेरडी रात्रंदिवस द्या द्याच करते.

**अखिल०**—नाहीं, नाहीं, तुह्मी सांगाच.

**वामा.**—तर सांगतें, पण मनांत मात्र कांहीं आणूं नका.

करणें भाग पडतें. शिवाय पवित्र प्रणय ह्मणजे मोठ्या ख-र्चाचें काम, व त्यांत जबाबदारीही मोठी.

**अखिल०**—बरें, **पारूल** तुझी मजवर किती प्रीति आहे?

**पारूल.**—किती प्रीति आहे तें काय सांगतां येईल? ज्या प्रीतीला परिमाण आहे ती कुचकामाची.

**अखिल०**—**बिहारी**, ऐक, ऐक.

**बिहारी.**—तूंच ऐक हें, मी आजच नाहीं ऐकत. फार पूर्वीपासून ऐकतों आहें.

**अखिल०**—**पारूल**, जर मला पैसे देण्याची ऐपत न-सती तरी देखील तुझी मजवर इतकी प्रीति असती का?

**पारूल०**—आपला मजवर विश्वास बसणार नाहीं हें मला माहीत आहे. दुर्दैवानें वेश्येच्या घरांत माझा जन्म झाला आहे. आपण पैसे दिले नाहींत तर उपाय नाहीं. पण पैशा-शिवाय कसें चालणार? दागिन्याबिगिन्यांची मला जरूर नाहीं, पण आईला समजत नाहीं, त्याला मी काय करूं? मला नेहमीं अशी भीति वाटते कीं आपण माझा त्याग क-राल. आपण पुरुष पडलां. पुरुषांचें मन काय सदा एक जा-गींच राहील?

**अखिल०**—नाहीं बरें **पारूल**. मी काय लंपट आहें ह्मणून दुसऱ्या स्त्रीवर माझें प्रेम जडेल? प्रणयाकरितां मी वेडा झालों होतों. पण तुझी गांठ पडली ह्मणून माझी इच्छा तृप्त झाली. तुला सोडून मी कोठें जाऊं?

**पारूल.**—दुसऱ्या कोठें नका जाऊं पण घरची स्त्री तर आहे ना? खरें सांगा चिरकाल का तुह्मी स्त्रीचा त्याग

मूर्ख कीं घालवून दिली तरी घरांतून बाहेर जात नाहीं.

**अखिल०**—**पारूल**, माझ्या दृष्टीनें ती परस्त्रीच. मी तुला एकदां सांगतों, तुझ्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं, मी व्यभिचारी नाहीं, लंपट नाहीं, तुला सोडून तिच्याकडे जरी गेलों तरी देखील मीं व्यभिचार केलासा होईल.

**बिहारी.**—शाबारे, तुझ्यासारखें धर्मज्ञान मीं कोठेंच पाहिलें नाहीं. स्वस्त्रीसंसर्गासारखा दुसरा व्यभिचारच नाहीं! तूं ह्मणतोस तेंच खरें. सकाळीं घरीं गेलास ह्मणजे तिला एका भाड्याच्या घरांत नेऊन ठेव. परस्त्रीला कोणी घरांत ठेवतें का? **पारूल**ला घरीं घेऊन जा ह्मणजे ती तुझ्या आईकरितां फराळाचें करीत जाईल.

**अखिल०**—**पारूल** स्वयंपाक करील?

**बिहारी.**—चूक झाली, चूक झाली, स्वयंपाकघरांत गेलें कीं प्रणयभंग झालाच. प्रणय ह्मणजे कांचेची वस्तु, जरा आंच लागली कीं तडकलीच.

(वामा येते.)

**वामा.**—एक गोष्ट सांगायला आलें आहें. जर कांहीं मनांत न आणाल तर सांगतें.

**अखिल०**—काय आहे? सांगा तर खऱ्या.

**वामा.**—नाहीं सांगत. तुह्मी ह्मणाल कीं ही थेरडी रात्रंदिवस घा घाच करते.

**अखिल०**—नाहीं, नाहीं, तुह्मी सांगाच.

**वामा.**—तर सांगतें, पण मनांत मात्र कांहीं आणूं नका.

इतके पैसे खर्चून तुझ्या [illegible]
पारूल कांहीं तीं घालीत नाहीं.

**पारूल.**—आई, मीं तुला सांगितलें होतें ना कीं बाबूंना ही गोष्ट सांगू नकोस ह्मणून? तूं आलीस तेव्हांच मला वाटलें कीं त्या जडावाच्या नागाबद्दल सांगायला आली असशील. रोजरोज इतका खर्च करविणें मला आवडत नाहीं. मला तो नागही नको व फुलेंही नकोत.

**वामा.**—पहा बाबा, मीं तुमच्याजवळ कांहीं मागितलें कीं **पारूल** रागावते. नाग नसला तर नुसतीं फुलें का शोभतात?

**पारूल.**—मी का कोठें नाचायला जातें ह्मणून नाग व फुलें घालायचीं आहेत.

**वामा.**—नाचायला गेलें नाहीं ह्मणून काय झालें? तुझ्या अंगावर दोन दागिने असले ह्मणजे त्यांत बाबूंचाही लौकिक आहे. एवढ्या थोरा मोठ्याचा आश्रय असून अंगावर दागिने नसले तर लोक काय ह्मणतील?

**बिहारी.**—ह्मणतात काय? तोंडावर थुंकतील. तुह्मी ह्या भाड्याच्या घरांत राहतां याबद्दल देखील किती बोलतात. मला ऐकवत नाहीं.

**वामा.**—**पारूल**च्या दैवीं जर स्वतःच्या घरांत राहणें असलें तर तेंही होऊन जाईल. ती यांच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही जाणत नाहीं. **मल्लिका**चा मधला मुलगा दरमहा तीनशें रुपये व राहण्याला एक घर देत होता, पण तो निरोप घेऊन येणाऱ्याची तिनें चांगली खरड काढली व त्याला परत लावून दिलें व आपली रडत बसली. वेडी

त्याची चीरफाड करतील.

अखिल०—काय हें संकट.

**पारूल.**—काका, घरांत जा तुह्मी. तुह्मी गुंगींत आहांत.

**विहारी.**—जातों बापडा. पण घरांत थोडें थालिपीठ खायला आहे का?

**वामा.**—कोठलें आलें आहे?

**पारूल.**—आई, थालिपीठ तें काय असतें ग?

**वामा.**—तो एक भाजणीचा पदार्थ असतो. गरीब लोक तो खातात.

**पारूल.**—बिहारीकाका, तुह्मांला दारू घ्यायची तर घ्या. पण हे जिन्नस माझ्या घरांत आलेले मला खपायचे नाहींत. आई, थोडेसे बदाम पिस्ते असले तर आणून देईनास?

**बिहारी.**—इतका खर्च करूं नका. नाहीं तर दिवाळें निघेल.

**अखिल०**—बिहारी, जाऊं देरे. (**पारूलच्या आईला** उद्देशून) नाग नसला तर नुसतीं फुलें वाईट का दिसतात?

**वामा.**—तसें नव्हे. स्वस्तांत मिळतो आहे ह्मणून ह्मणतें, त्याची दलाली वगैरे कांहीं लागणार नाहीं. कामिनीच्या घरांतली भाडेकरीण विलासिनी नाग विकते आहे. सात तोळे वजन व शंभर नंबरी सोनें.

**अखिल०**—बरं तर, तुझी आणून ठेवा, मी पाहीन.

**वामा.**—ह्मणून तर थोर लोक ह्मणजे मोठे उदार. बरें मग पान वाढूं का?

**पारूल.**—वाढ, बाबूंचें दिवसा कांहीं खाणें झालें नाहीं.

**बिहारी.**—होणार कोठून? घरीं आई, बहीण व बायको इतक्यांचा त्रास. काळजी घ्यायला आहे कोण?

**वामा.**—जातें, मी पानें वाढतें. (जाते.)

**पारूल.**—बाबूसाहेब, तुह्मी ह्या वेळीं नाग घेऊं नका. उगीच कां दोनशें अडीचशें रुपये खर्च करतां?

**बिहारी.**—बाबारे बायकोची गोष्ट ऐक. नको सध्यां विकत घेऊं.

**अखिल०**—न घेऊन कसें चालेल. मीं हिच्या आईला वचन दिलें आहे.

**बिहारी.**—ह्मणून का तुला नरकाची भीति पडली आहे?

(पडद्यांत **वामाः**—**पारूल**, बाबूंना घेऊन ये.)

**पारूल.**—चला, बाबूसाहेब, फराळाला.

**बिहारी.**—मलाही दोन पुऱ्याबिऱ्या दे. रात्रीं तुझ्या येथें राहण्याशिवाय माझी कशालाही ना नाहीं.

**अखिल०**—चल तर.

**बिहारी.**—अखिल, चिरकाल तूं असाच पवित्र प्रणय कर. घरच्या परस्त्रीला बाजारांत पाठीव. ह्मणजे माझ्या चैनीला खंड पडणार नाहीं. घरच्या भाजीभाकरीचा मला अगदीं वीट आला आहे. (सर्व जातात.)

**अंक ३ रा समाप्त.**

---

## चतुर्थ अंक.

### प्रथमगर्भांक.

### मृत्युंजयाचा दिवाणखाना.

आमोदिनी व तरुबाला.

**आमो०**—ये ये, तरू, तूं या वेळीं येथें येशील अशी माझी कल्पना देखील नव्हती. आतां तर तब्येत बरी आहे ना?

**तरु०**—बरी आहे, तरी पण कधीं कधीं डोकें दुखतें. व छातींत धडधडतें. औषध तर आतांच घेतलें, पण कसर कांहीं अद्याप गेली नाहीं.

**आमो०**—तोच मुख्य रोग. त्यानेंच तर तुला इतका त्रास होतो. ही कसर डाक्तराच्या औषधानें जाणारी नव्हे, त्याला मनाचाच निश्चय पाहिजे, त्याशिवाय कांहीं होणें नाहीं.

**तरु०**—काय ग आजी, मंत्र, तंत्र, जादूटोणा वगैरे सर्व खरें आहे का ग? त्यांना कोणीं जादू तर केली नाहीं ना? तसें नसतें तर मला पाहण्याकरितां डाक्तर कशाला आणते व रात्रींतून एकदां तरी येऊन मला कां पाहून जाते? मग मलाच आपल्याकडे कां येऊं देत नाहींत. ह्या सर्व लक्षणांवरून त्यांचें मजवर प्रेम आहे खास.

**आमो०**—मीं तुला सांगितलें नाहीं हा त्याचा वेडेपणा ह्मणून. पुस्तकांतल्या साहेब मडमींच्या गोष्टी वाचून वाचून त्याचें मन बिघडलें आहे. मला एक विचार सुचला आहे, त्यानें तो तुझ्या कह्यांत येतो कीं नाहीं हें एक वेळ पाहतें.

तरु०—कांहीं जडीबुटी आहे की काय? तसलें कांहीं असेल तर मला त्याची जरूर नाहीं. पाहिलीस ना त्यांच्या शरीराची कशी अवस्था झाली आहे ती. करायला जाशील एक आणि होईल भलतेंच.

आमो०—तें औषध कांहीं खायचें प्यायचें नाहीं, तें एक निराळेंच औषध आहे. त्याचा रोग मला समजला आहे. जसा रोग तसें औषध.

तरु०—त्याची कांहीं जरूर नाहीं. मीं सासूबाईंना सांगितलें आहे, पण तूंही आजोबांचा विचार घेऊन एखादी चांगली मुलगी पाहून त्यांचें लग्न करून दे, ह्मणजे सर्व ठीक होईल. मीच त्यांच्या सर्व दुःखाचें कारण आहें.

आमो०—लग्न करून देऊं? माझ्या लाडक्या तरूपेक्षां अधिक चांगली मुलगी कोठें मिळेल? तरूवर जर त्याचें प्रेम बसत नाहीं तर त्याच्या दैवीं सुखच नाहीं असें ह्मटलें पाहिजे. मी तुला सवत करून देऊं? खरेंच सांग तरु, मी असें करीन काग?

तरु०—आजी, मी काय ह्मणतें तें तुला समजलें नाहीं, लग्न झालें ह्मणजे ठीक होईल. ते काय ह्मणतात तें मला कळत नाहीं. मीं इंग्रेजी वगैरे कांहीं शिकलें नाहीं हेंच त्यांच्या रागाचें कारण. अलीकडे पुष्कळ मुली इंग्रजी शिकून मडमा बनल्या आहेत, त्यांतून एखादी पसंत करून काढ ह्मणजे ते गृहवासी होतील.

आमो०—तुला वेड लागलें आहे असें वाटतें. वेडाची लहर आली ह्मणजे तूं सासूबाईंचे पाय धरतेस, व त्यांचें दुसरें लग्न करून द्या ह्मणून सांगतेस झालें.

तरु०—नाहीं आजी, मी रागानें बोलत नाहीं. मी अंत:करणपूर्वक सांगतें कीं जेणेंकरून त्या राक्षसिणीचा संबंध सुटून ते गृहवासी होतील असें कर. त्यांच्या जीवाला सुख असलें ह्मणजे मला आनंद आहे, माझें काय? मी सासूबाईंची सून. हजार जरी सवती असल्या तरी सासूबाईंची मजवरची प्रीति कधींही कमी होणार नाहीं.

**आमो०**—तसेंच होईल. तसेंच होईल. मला जें योग्य दिसेल तें मी करीन. मीं सांगतें तें ऐक. आतां तीन वाजून गेले. तुझी औषध घेण्याची वेळ झाली. तर घरीं जा व औषध घे आधीं.

**तरु०**—बरें जातें.

**आमो०**—शान्ता देखील का आईबरोबर सोनजईला गेली आहे?

**तरु०**—हो, वन्संचा आपल्या दिराबद्दल कांहीं नवस होता तो फेडायला त्या गेल्या आहेत.

**आमो०**—तें कांहीं असो, मुलगी मोठी गुणाची खरी. वैधव्यानें तिला जसें कांहीं ह्मातारपण आलें आहे, नाहीं तर इतके उपास तापास व देवधर्म कशाला? बरोबर आणखी कोण गेलें आहे?

**तरु०**—घरची ह्मातारी मोलकरीण व गवळण सहचरी. मी आतां जातें.

**आमो०**—जा, पण संध्याकाळीं त्या परत आल्यावर एक वेळ इकडे ये व येतांना ढेंकणांचेंही औषध बरोबर घेऊन ये. काल माझ्या मच्छरदाणींत दोन ढेंकूण सांपडले.

**तरु०**—आणीन, अवश्य आणीन.

(जाते.)

**आमो०**—देते तर आणून.

(जाते.)

**हाराण.**—ताईला वाटलें कीं मला खरीच भूक लागली आहे. मला लागली आहे सहचरीची भूक. बेटी माझ्याशीं गमजा लावते तें मला कळत नाहीं कीं काय? पण कळून संवरून मी आपला मूर्ख तो मूर्खच.

(आमोदिनी पुन्हां येते.)

**आमो०**—हें घे दूध. पाणी पाहिजे का?

**हाराण.**—दुधावर का मी पाणी पिऊं?

**आमो०**—बरें पण मोलकरणीकडून वाटी धुवीव हो. मी दशम्या करायला स्वयंपाकघरांत जातें.

(जाते.)

**हाराण.**—ह्या दुधानेंच काय समाधान होईल तें खरें. सहचरीच्या घरचें दूध! तिच्या गायीच्या आंचळांतलें! (एक घोट घेतो.) अहाहा! किती मिष्ट! जणूं काय खीर!

(आणखी एक घोट घेतो.) बासुंदी बासुंदी! तिनें स्वतः काढलेलें! ओहोहो! त्या गोंडस व पुष्ट हातांनीं काढलेलें! चुळ् चुळ्, गबुर् गबुर्. (आणखी एक घोट.) किती स्वादिष्ट! किती मधुर! सहचरी, तुझ्या गाईचे आंचळ ह्मणजे उंसाचें शेत, व तुझे हात ह्मणजे खडीसाखर! (घट्कन् सर्व पिऊन टाकतो) माझा प्राण अगदीं वरवर येत होता पण सहचरीच्या घरचें दूध प्यायल्यानें थोडा शांत झाला. माझा मेव्हणा मला एक बनात घेऊन देणार आहे पण ती कशाला, ह्या प्रीतीच्या उकाड्यानें मला घाम सुटतो आहे हें कोठें त्याला माहीत आहे. तिच्यावर बलात्कार करूं का? वाः, छान विचार सुचला. सहचरी आज वनभोजनाला गेली आहे. तर नशिबाची एक वेळ परीक्षा पहावीच. शामबाजाराच्या पुलाजवळ तिची वाट पाहत उभा राहतों. संध्याकाळीं ती परत येईलच. ती दृष्टीस पडतांच मागून जाऊन तिचा पदर धरीन. हे सहचरी, हे गोपी गवळणी!

(जातो.)

---

## द्वितीयगर्भांक.

### बेलबाग.

**वेणी, सहचरी व शान्ता.**

**सह०**—हें पहा, हे साधुमहाराज येथें ध्यानस्थ बसले आहेत.

**शान्ता.**—ह्या वेळीं त्यांच्या दर्शनाला जाणें चांगलें नाहीं. कारण मीं वहिनीला विचारलें नाहीं व आजीलाही विचारलें नाहीं. त्यांना विचारून आणखी एखादे दिवशीं येऊं.

आतां आपण जाऊं, नाहीं तर आई उगाच रागावेल.

**सह०**—दर्शनाला वेळ कितीसा लागणार? तुला बाग दाखवून आणतें ह्मणून मीं तुझ्या आईला सांगितलेंच आहे, आतां आली आहेस तर एकदा साधुमहाराजांना नमस्कार करून मग जाऊं.

**शान्ता.**—चल तर, नुसता नमस्कारच करून येऊं.

**सह०**—साधुमहाराज, प्रणाम झाला, आतां आपली कृपादृष्टि होऊन आशीर्वाद व्हावा.

**वेणी०**—शिवशंकर! शिवशंकर! हरहर विश्वेश्वर! कौन हे रे बेटी.

**सह०**—साधुमहाराज, मी आपली दासी. आपली कीर्ति ऐकून आह्मी दर्शनास आलों आहों. तर कृपा करून ह्या माझ्या बहिणीला कांहीं औषध द्या. औषध हिला स्वतःला नको. हिचा भाऊ बिलकुल घरीं राहत नाहीं व बायकोकडे पहातही नाहीं. त्याला ताळ्यावर आणण्याकरितां कांहीं अंगारा बिंगारा द्या ह्मणजे ती तो आपल्या भावाच्या कपाळाला लावील.

**वेणी०**—इन्हीका भाई? आरे इसका तो बडा लच्छन दिखता है, देखें छोकरी तेरा हात.

**शान्ता.**—सहचरी, मी नाहीं आपला हात दाखवीत. माझें आतां काय पहायचें उरलें आहे.

**वेणी०**—अरे भगवान्! जो तेरा ललाटमे बडा भागवान् संतान लिखा हाय, ओ संतान जनमसे दुनियेका भला करेगा, जगत्मे धरम शिखायेगा.

**शान्ता.**—ऐकू काय? महाराज आपण काय ह्मणतां? मी आपल्या वयाच्या तेराव्या वर्षी विधवा झालें, आतां मला संतान कोठून होणार?

**वेणी०**—तेरा ललाटमे लिखा देखता, हाम क्या करे? संतान होनाही चाहिये.

**शान्ता.**—**स**हचरी, चल ग आपण जाऊं आतां.

**वेणी०**—अरे बैठो बैठो, तेरा जनम नच्छत्तर मिलायके सादी हुवा नही, उसीवास्ते तू विधवा हुवा. तेरा जो स्वामी लिखाथा ओ आबी जीता है, उसीसे तेरा संतान होगा. तेरे वास्ते वो पागल होके घूमता है. तुम् उससे सादी न करोगे तो बिचारेको मरण लिखा है. मरण मे तेराही पातक लगेगा.

**शान्ता.**—ह्या काय गोष्टी. **स**हचरी, चल ग तूं.

**वेणी०**—शास्त्रके व्याख्या, धरमके व्याख्या होता है, तुम बेजार होती काहे?

**शान्ता.**—विधवेच्या लग्नाच्या गोष्टी हा का आपला शास्त्र व धर्मविषय?

**वेणी०**—शास्त्रका कथा नही? लिखा है. सादी करो, कुच अधरम नही, हम उपदेश देता है; तेरी एहि छोकरी उमर, एहि सुंदर सुरत, आत्माको क्लेश देना नही चाहिये.

**शान्ता.**—ज्याकरितां आपण आलों त्याचें तर कांहींच झालें नाहीं. **स**हचरी, ह्या गोष्टी ग कशाला?

**सह०**—महाराज, हिच्या भावाला औषध द्या. **शा**न्तेला स्वतःचें कांहीं विचारावयाचें नाहीं.

**सह०**—ही पहा गेलें कीं आलेंच. घाट चार पावलें देखील दूर नाहीं. हे साधुलोक, ह्यांची कसली भीति?

(जाते.)

**वेणी०**—बम् महादेव! बोलदे बाबा बोलदे. क्या नाम बोला—**शान्ता**? बडा मीठा नाम **शान्ता**. **शान्ताका** अदृष्ट हामको देखाय दे, क्या बोला बाबा—बडा धरमशील संतान होगा? उनका जनमसे पृथिवी पवित्र होगा? संतानका बाप कैसा होगा बडा आच्छा आदमी, **शान्ताको** बहुत प्यार करेगा, उनका एक सादी है, वह औरत बिचारेको बहुत तकलिफ देती है, **शान्ताके** साथ मिलन होनेसे वो स्त्रीका मूबी नही देखेगा, **शान्ताके** वास्ते वह आबी पागल होके धूमता है.

**शान्ता.**—महाराज, मी आपल्या पायां पडतें, आपण ह्या गोष्टी मला ऐकवूं नका, मला त्यापासून फार त्रास

नको. दुसऱ्या कांहीं गोष्टीसंबंधानें आपण बोला, त्याचें ध्यान चालूं द्या.

**वेणी०**—पागल हुवा है, पागल हुवा है. रोरोके घूमता है. शान्ताके साथ शादी न होनेसे वह मर जायेगा, यथार्थ ही मर जायेगा. शान्ता दया ना करले मरे जावे, उन्माद हुवा है, उनके वास्ते उन्माद हुवा हे.

**शान्ता.**—हें काय–हें काय, आपण कोण?

**वेणी०**—दया कर, शान्ते, दया कर. तुझ्याकरितां मी मरतों आहें.

**शान्ता.**—काय हा प्रसंग! सहचरीनें मला फसविलें खास, आवाज तर ओळखीचा वाटतो. सहचरी, सहचरी, महाराज आपण कोण?

**वेणी०**—(कृत्रिम जटा व मिशा काढून) तुझा दास, तुझा प्रेमप्रणयी. मी तुझ्या पायां पडतों, मजवर दया कर.

**शान्ता.**—ऑं! वेणीदादा! तूं—तूं—वेणीदादा.

**वेणी०**—शान्ते, दया कर, दया कर.

**शान्ता.**—वेणीदादा, तुझेंच का हें कृत्य? मी तुझी धाकटी बहीण. फक्त तूं माझ्या आईच्या पोटांतून निघाला नाहींस इतकेंच कायतें.

**वेणी०**—केवळ प्राण वांचविण्याकरितां मीं हें साहस केलें. पुष्कळ दिवस मन दाबून ठेवलें होतें, पण आज अगदीं निरुपाय झाला. मी तुझ्या पायां पडतों.

**शान्ता.**—दूर हो, दूर हो, पायाला हात लावूं नकोस. छी, छी.

**वेणी०**—भिऊं नकोस, मी तुझ्याशीं कुव्यवहार करणार

नाहीं. माझा कांहीं दुष्ट हेतु नाहीं. मी तुझ्या प्रीतीचा भुकेला आहें. तुझ्याशीं विवाह करण्याची माझी इच्छा आहे. माझ्या मनांतली ही गोष्ट एकांतीं तुला कळविण्याची मला आजवर संधीच मिळाली नाहीं, ह्मणून ही युक्ति करावी लागली. तुझ्यावर माझें किती प्रेम आहे, व तूं प्राप्त व्हावीस ह्मणून माझे प्राण कसे व्याकुळ झाले आहेत, मी तुला कोणत्या दृष्टीनें पाहतों आहें, व तूं प्राप्त झालीस तर मला किती सुख होईल, हें तुला कळविण्याकरितां आज मी साधु झालों होतों.

**शान्ता.**—माझ्या समोर अशा गोष्टी बोलण्याची तुला शरम नाहीं वाटत? तूं मला मांडीवर घेऊन लहानाचें मोठें केलेंस ना?

**वेणी०**—खरोखर तुझ्यावर माझें फार प्रेम आहे. अगदीं लहानपणापासून प्रेम आहे. त्या भगिनीप्रेमाचें हें रूपांतर झालें आहे. तूं समजत असशील कीं मला स्त्रीसमागमांत सुख आहे, पण नाहीं. दामिनी नेहमीं नेहमीं कटु शब्द बोलून माझ्या काळजाला घरे पाडिते. तिच्या उग्र मूर्तीची तुझ्या सौम्य मूर्तीशीं तुलना केली ह्मणजे तुला प्राप्त करून घेण्याचे विचार प्रबळ होऊन मनांत काहूर उठतें.

**शान्ता.**—धिक्कार असो तुला! तोंड दाखविण्याची तुला अद्यापही शरम वाटत नाहींना?

(जाऊं लागते.)

**वेणी०**—जाऊं नकोस, उभी रहा. माझें सांगणें अद्याप संपलें नाहीं. मी सांगतों ती गोष्ट ऐक.

**शान्ता.**—रस्ता सोड, मला जाऊं दे, नाहीं तर मी ओरडेन.

तुझा जर रुकार नसेल तर तुझ्या अंगाला मी स्पर्शही करणार नाहीं. तसला विचार माझा नाहीं. जुलमानें तुला वश करून घेण्याची माझी इच्छा नाहीं. तुझी संमति असेल तर तुझ्याशीं विवाह करण्याची माझी इच्छा आहे. माझी स्त्री होण्याला तुझी कांहींएक हरकत नसावी. विवाहसौख्याला आपण दोघेंही आंचवलों आहोंत तर तूं रुकार दे ह्मणजे आपण दोघेंही सुखी होऊं.

**शान्ता.**—तूं कपटी नाहींस पण वेडा आहेस.

**वेणी०**—वेडा, अगदीं वेडा, तूंच मला वेडें केलेंस. मला वेडा केलास व आपणही वेडी झालीस. तूं वेडी झाली नसतीस तर आपखुषीनें स्वसुखावर पाणी सोडण्यास कां तयार होतीस? माझी आणखी एक गोष्ट ऐक, व मग तुला वाटेल तें कर. खरेंच सांगतों कीं जर तूं प्राप्त झाली नाहींस तर मी वांचणार नाहीं. मग असें खंगून खंगून तरी कां मरावें? जर तूं माझा स्वीकार करणार नसलीस तर हा पहा मी तुझ्या समोरच जीव देतों. बोल तर मग, तूं माझी होशील ना? होणार नसशील तर हा पहा खंजीर. हाच छातींत भोंसकून घेतों.

**शान्ता.**—असें जर करशील तरच बहिणीशीं तूं जें हें अयोग्य वर्तन केलेंस त्याचें अंशतः तरी प्रायश्चित घेतलेंस असें होईल.

**वेणी०**—सांग—मी मरूं तर?

**शान्ता.**—तूं जें कृत्य केलें आहेस त्याबद्दल मरणें हेंच तुला योग्य आहे. पण तूं कोठला मरायला! जो क्षणिक

मी हिंदु विधवा, माझा हा देह व्यर्थ आहे हें मला माहीत आहे. सहगमनाची चाल नाहीं ह्मणून इलाज नाहीं, नाहीं तर ज्या दिवशीं पति परलोकवासी झाले त्याच दिवशीं मोठ्या आनंदानें मीं आपला प्राण चितेला समर्पण केला असता. अजूनही माझा प्राण पतिचरणींच आहे व प्राणशून्य कलेवर मात्र येथें आहे. त्याला कसल्याही सुखाची अपेक्षा नाहीं. पण तूं ज्या अर्थीं ह्या निर्जीव कलेवराकरितां नरक-साधनाची इच्छा करतोस त्या अर्थीं मरण हें काय तुझ्या स्वाधीनचें आहे?

**वेणी०—शान्ते, शान्ते** तुझा माझ्यावर विश्वास नाहीं ना?

**शान्ता.**—तुझ्यावर विश्वास! त्यापेक्षां एखाद्या विषारी सापावर विश्वास ठेवून त्याच्या तोंडांत हात घालणें काय वाईट? विश्वासाची गोष्ट तोंडांतून काढण्याची तुला अद्यापही शरम वाटत नाहीं आं? आपल्या कृतीनें तूं सर्व साधुवर्गाला डाग लावलास. मी कुलवधू आहें, मला उघड रीतीनें बाहेर जाण्याची बंदी. देवळांत व साधुसंतांच्या दर्शनास जाण्यास कांहीं हरकत नाहीं. साधु समजून मोठ्या विश्वासानें मी तुज-पुढें आलें, परंतु ह्यापुढें एखादा खरा जरी महापुरुष असला तरी त्याजपुढें जाण्याला माझें मन कचरेल. भाऊ समजून मी तुझ्याशीं निष्कपटपणानें वागलें पण ह्यापुढें कोणाशींही बंधु-संबंध ठेवण्याला माझ्या मनाला प्रशस्त वाटणार नाहीं. जन्मभर विस्मृति पडणार नाहीं असा अविश्वास दाखवून पुन्हां विश्वासाच्या गोष्टी तुझ्या तोंडून निघतात तरी कशा?

**वेणी—शान्ते,** मला क्षमा कर. तुझ्याशीं कपट केलें

कीं तुजवर माझें अतिशय प्रेम आहे.

**शान्ता**.—अजूनही ह्या गोष्टी! मोठेंच आश्चर्य! तूं मला अगदीं लहानपणापासून जाणत असून हें तुला कसें समजलें नाहीं? मला वेळोवेळीं विधवाविवाहाच्या गोष्टी सांगितल्यास त्या त्या वेळीं मीं काय उत्तर दिलें तें ध्यानांत आण. स्त्रीपुरुषांचा संबंध केवळ ह्या लोकचाच नाहीं. मीं महाभारतांत वाचलें आहे कीं तो परलोकचा देखील आहे. मेल्यावर मग परलोकीं किती पतींची सेवा करावयाची? शिवाय मी एका कुळांतून दुसऱ्या कुळांत आलें आहें, एका गोत्रांतून दुसऱ्या गोत्रांत आलें आहें. साहेब लोकांसारखी पतिपत्नींनीं वेगळें राहण्याची चाल आपल्यांत नाहीं. सासूसासऱ्यांची मी एकटी सून. लग्न करून त्यांनीं मला आपल्या कुळांत व गोत्रांत घेतली, तें कुळ किती वेळ बदलायचें? तुला सांगतें तें ऐक. जें पातक तूं आज केलें आहेस त्याचें क्षालन होण्याकरितां तुला काय प्रायश्चित्त घेतलें पाहिजे तें मला सांगतां येत नाहीं, तरी पण तुझ्याशीं कठोरपणानें वागण्याची माझी इच्छा नाहीं. मी लहान होतें तेव्हांपासून तुझें मजवर प्रेम होतें, मला तूं लिहिणें वाचणें शिकविलेंस व मीही तुला भाऊ व गुरु समजत होतें. आजच्या कृत्यांत जर दुसरी एखादी मुलगी असती तर भिऊन ओरडती, पण मी अजूनही तुझ्याशीं शांतपणानें बोलत आहें. मीं स्वतःला पक्कें ओळखलें आहे. जबरदस्ती किंवा लालूच ह्यांपैकीं कशाचाही मजवर परिणाम घडणार नाहीं. देवतांनीं माझ्या अंगांत संचार करून मला बलवान् केलें आहे. ईश्वराच्या नामस्मरणाशि-

मग ह्या देहाव दुसरें कोणाच्या पातिव्र्य उरलें नाहीं. तूं किती-
तीही प्रयत्न केलास व कशीही लालूच दाखविलीस तरी हें पक्कें ध्यानांत ठेव कीं माझें मन कधींही लालचावयाचें नाहीं. उलट ह्या तुझ्या गर्ह्य कृत्यानें तुझा माझा बंधुभगिनी-संबंध मात्र तुटला.

**वेणी०**—शान्ते, तुझ्यासारखी पतिव्रता आजपर्यंत माझ्या आढळण्यांत आली नाहीं. मी थोडें बहुत शिकलों आहें, मी लंपट नाहीं, आतां माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव. मी खरेंच सांगतों कीं तुझ्यासारखी स्त्री जर मला मिळेल तर मी मोठा भाग्यवान् होईन. संसारांत लोकांनीं माझा कित्ता घ्यावा असा होईन. जें कांहीं झालें तें सर्व विसरून जा, व मला आपल्या हृदयांतून हांकून देऊं नकोस. तुझी सरलता व तुझें सौंदर्य हीं पाहून मी वेडा झालों होतों. आतां माझी खात्री झाली कीं तूं ह्या लोकची नाहींस. आतां झालेल्या सर्व गोष्टी विसरून जा, व मी जो तुझा वेणीदादा होतों तोच समजून मला आपल्या अंतःकरणांत पूर्वीप्रमाणेंच जागा दे. जें दुःख भोगण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे तें मी आनंदानें भोगीन.

**शान्ता.**—तूं दुःख कां भोगतोस? पतिसुखाला सर्वस्वी आंचवलें असूनही मी एक प्रकारें सुखी आहें व तूं संसारी असून तुला सुख मिळत नाहीं? सुखदुःख सर्व आपल्याच हातीं आहे. वहिनी जर तुझ्या मनासारखी नसेल तर ती तुझ्या मनाप्रमाणें वागेल असें तिला वळण लाव. दागिनेबिगिने करण्याची जर तुला ऐपत नसेल तर तिच्या वर प्रेम ठेव, व तुला सुख होण्याकरितां मी किती परिश्रम

तरी बाहेर जातो. दवाखाना विकून जे काही पैसे मिळतील ते तुझ्या आईला देऊन टाकून मग परिवार घेऊन काशीस जाईन. थोडी बहुत डाक्तरी शिकलों आहें त्यावर कसा तरी गुजारा होईल. पण एक गोष्ट मला सांग. तूं आजची गोष्ट विसरून जाशीलना? मला पूर्वीचाच वेणीदादा समज-शीलना?

**शान्ता.**—वेणीदादा, जर तुला खरा पश्चात्ताप झाला असेल तर तुझ्या ह्या आजच्या कृत्याबद्दल मी तोंडांतून ब्रही काढणार नाहीं, व तुला पूर्वीचाच वेणीदादा समजेन. ज्या दुष्ट लोभानें तूं आजचें हें कृत्य करण्यास प्रवृत्त झालास तो लोभ मोठाच वाईट आहे, त्यापासून परावृत्त होणें हें काम सहज नाहीं. तुझ्या मनाला जर खराच पश्चात्ताप झाला असला तर तुजवर राग करणें तर बाजूलाच राहिलें, पण तुला साधु समजून मी तुझी पूजा करीन, माझा दादा समजून माझ्या हृदयांत तुला अक्षय स्थान देईन, पण तूं जें सांगि-





**वेणी०**—तूं एकटी जाशील का?

**शान्ता.**—आई समोरच्या बागेंत भोजनाची तरतूद करीत आहे, तेथपर्यंत मी एकटी सहज जाईन.

(जाते).

**वेणी०**—मला भ्रम झाला होता, मी वेडा झालों होतों, साक्षात् स्वर्गीय प्रतिमेला रक्तमांसनिर्मित मनुष्यप्रतिमा समजलों. केवढा तिचा मोठेपणा! ती ओरडली नाहीं किंवा रागावली नाहीं. अमानुषिक अशा हृदयबलानें, मनाच्या दृढनिश्चयानें व शांत स्वभावानें शान्तेनें माझ्या जीवितौघाला निराळी दिशा लावून दिली. मनांत आल्याप्रमाणें मी काशीस जाऊन राहतों, व आपल्या आचरणाचें रूपांतर करून टाकतों.

(जातो.)

**अंक ४ समाप्त.**



## प्रथमगर्भांक.

## पारूलचें घर.

वामा व पारूल.

**वामा.**—उघड बघूं तुझी खणाची पेटी, पाहूं दे मला त्यांत किती रुपये सांचले आहेत ते?

**पारूल.**—माझ्या रुपयांशीं तुला काय करावयाचें आहे, तुझ्या खर्चाला तर मी पुरेसे देतें ना?

**वामा.**—ह्याला का पुरेसे ह्मणावयाचे? खर्च तर रोज रोज वाढत चालला आहे. एकट्या तुझ्याकरितांच किती तरी खर्च होतो?

**पारूल.**—माझ्याकरितां कसला खर्च? जर मला कांहीं चांगलें चुंगलें खायला घालतीस तर मग काय करतीस न कळे! नुसती एक भाजी व दोन जळक्या रोट्या ह्यांशिवाय मला दुसरें काय खायला घालतेस?

**वामा.**—जळक्या पोळ्या का तुला मी खायला घालतें? तुपांत चांगल्या चबचबीत भिजवून मग तुला देतें तरी हा तुझा निमकहरामपणा? शिवाय रात्रीं खातेस तें वेगळेंच; पुन्हां बाबूबरोबर खाण्याची तयारी.

**पारूल.**—बाबूबरोबर काय खातें, पुऱ्यांचे एक दोन तुकडे. शिवाय तर कांहीं नाहीं ना?

**वामा.**—पण बाबूंना मोठ्या आदरानें व आग्रहानें खा-

चवितेस ना? काय त्या बाबूची प्रौढी. शंभर तर पगार देतो; त्यांतले पंचवीस तीस तर महिन्याच्या काठीं त्याच्या पोटाला लागतात. शिवाय दोन महिन्यांचा पगार अजून देणें बाकी आहे. ते रुपये कसे वसूल करशील? का मिळाले असून लपवून ठेवले आहेस?

**पारूल.**—हो, लपवून त्याच्या जमिनी खरेदी केल्या आहेत.

**वामा.**—जमिनी खरेदी कर किंवा वाटेल तें दुसरें कांहीं खरेदी कर; मला काय त्याच्याशीं करावयाचें आहे. पण मला संशय आला ह्मणूनच ह्मटलें कीं, तुझी पेटी उघड.

**पारूल.**—माझ्या पेटींत कांहींही असलें तरी त्याच्याशीं तुला काय करावयाचें आहे? चल निघ येथून, मीं देहक्रय करून पैसा मिळवावा व हिनें चैन करावी. माझ्या कपाळीं पुरतें खायाला देखील नसावें. ह्मण आहे कीं नाहीं "धन्याला धत्तुरा व चोराला मलिदा."

**वामा.**—कार्टी तोंडावर देखील पहा कशी चुरचुरु बोलते आहे. जा मर तर.

( हिरालाल येतो. )

**हिरा०**—पारूल, अरे! आई देखील येथेंच आहे.

**वामा.**—कायरे, हिरालाल.

**हिरा०**—आई, पारूल जर एक काम ऐकेल तर कांहीं प्राप्ति होईल.

**वामा.**—सांग पाहूं काय आहे तें.

**हिरा०**—सध्यां अखिलबाबू येथें नाहीं. पारूल जर दोन चिजा ह्मणेल तर वीस रुपये मिळतील.

करूं नकोस. मी का तशांतली बायको आहें? मला फसवायला आला आहेस वाटतें?

**हिरा०**—नाहीं बरें **पारूल**, तुला विश्वास नसेल तर खिडकींतून पहा. उत्तरेकडील एक श्रीमान् गृहस्थ गाडींतून आला आहे. मीं तुझी गोष्ट त्याला सांगितली. तुझ्या तोंडून दोन चिजा ऐकण्याचें त्याच्या मनांत आहे.

**पारूल.**—त्याची मला जरूर नाहीं. आला आहे तर बरें झालें. मला काय त्याचें?

**वामा.**—पोरी, तुला झालें आहे तरी काय? वीस रुपये फुकटच्या फुकट बुडवावयाचे?

**पारू०**—ह्या सभ्य गृहस्थाचा पगार मी खातें आहेंना? तो काय ह्मणेल?

**वामा.**—राहूं दे तुझा सभ्य गृहस्थ व पगार. दोन महिन्यांचा पगार तर अद्याप आलाच नाहीं.

**हिरा०**—**पारूल**, मींच त्याला आणला होता. मी सर्व सांगतों. वेणीबाबू काशीला गेला. दवाखाना बंद झाला, व त्याच्या इस्टेटीवरच्या मुखत्यारानें पंच नेमण्याविषयीं अर्ज केला आहे.

**वामा.**—**हिरालाल**, मीं सांगतें, कीं तूं त्यांना आण. जा गाडींतून उतरून घेऊन ये.

**पारूल.**—आणि अखिलबाबू आले तर?

**हिरा०**—**पारूल**, त्याची तजवीज मीं केली आहे. त्याच्या आतेच्या घरीं आज सत्यनारायण आहे. ह्मणून स-

ण्याची भीति नको. जर आलाच तर पहांटे येईल.

**वामा.**—जा रे हिरालाल, तूं घेऊन ये. एवढ्या मोठ्या गृहस्थाला किती वेळ गाडींत तिष्ठत बसवायाचें?

**हिरा०**—मी तरी हेंच ह्मणतों. पण मला चार रुपये दिले पाहिजेत.

**वामा.**—चल जा. त्या दिवशीं तुला एक शालजोडी दिली ना? आज दोन रुपये मिळतील.

**हिरा०**—बरें, तुह्मांला वाटेल तें द्या.

(जातो.)

**वामा.**—हें बघ, मी आतां खालीं जातें. त्यांचा चांगला मान मरातब ठेव. गाणें वगैरे ऐकीव, व साधेल तर ज्यास्ती कांहीं तरी उपटण्याची तजवीज कर. ते चोबे, मथुरेचे राजे. त्यांच्या जवळ खूप पैसा. समजलें?

(जाते.)

**पारूल.**—आज नाहीं तर उद्यां मला दुसरें गिऱ्हाईक पाहिलेंच पाहिजे. अखिलाचें बहुतेक संपुष्टांत आलेंच. बरें मग चोबेच सई.

(शोभनलाल व हिरालाल येतात.)

**हिरा०**—यावें, यावें, ठाकुरसाहेब. पहा माल कसा आहे तो.

**शोभन.**—बंदगी बिबीसाहेब.

**पारूल.**—बंदगी.

**हिराला०**—बसा ठाकुरसाहेब, जरी आपल्याला घरदार आहे तरी हें आपलेंच घर असें समजावें.

**हिरा०**—मी सांगतों ना येणार नाहीं म्हणून.

**पारूल.**—(स्वगत) मी काय त्याची बटिक आहें! हिरू, काय द्यायचें तें देत कां नाहींत.

**हिरा०**—ठाकुरसाहेब, थोडे रुपये द्या. आधीं द्या आणि मग गाणें ऐका.

**शोभन.**—अरे, पैशाची काय बिशाद आहे? बिबीसाहेब, किती रुपये पाहिजेत बोला. हे घ्या. आपल्याला इंग्रजी येतें का? ही वीस रुपयांची नोट आहे. (नोट देतो.)

**पारूल.**—बंदगी. हिरूदादा, आई काय करते आहे तें एकदां पाहून ये.

**हिरा०**—आई, ए आई, अरे! येथें कोठेंच दिसत नाहीं. मला वाटतें ती दुकानांबिकानांत गेली असेल.

**पारूल.** (जनान्तिक)—गप्प बैस.

**शोभन.**—बिबीसाहेब, आतां तरी एखादी चीज ऐकवा.

**पारूल.**—काय गाऊं?

**शोभन.**—जें तुह्मांला आवडेल तें.

**हिराला०**—गा, गा लवकर. ह्यांना मग यजमानाच्या घरीं जायचें आहे.

**पारूल.**—

(होय मला अपशकुन०-या चालीवर.)

आड नको येऊं, सखे गे। स्वप्नसुखा मज भोगूं दे गे ॥ ध्रु० ॥

ज्यां न देखिली जरि ती मूर्ति।
तीविण हृदयीं अन्य न वागे ॥ १ ॥
उज्ज्वल शशिमुख तें या माझ्या।
हृदया रंजित करि अनुरागें॥ २ ॥
शांतवीन ही तप्त तनू त्या।
रूपसागरीं बुडुनी वेगें ॥ ३ ॥

(बिहारी येतो.)

**बिहारी.**—ओहो, क्या बात, क्या बात. कां आज ह्या वेळीं गाणें?

**हिराला०**—बिहारीकाका, काय हें. मुकाट्यानें बसा, गडबड करूं नका.

**बिहारी.**—कोण हो बाबा तुह्मी, सारंगीवाल्यासारखे बसलां आहांत ते?

**शोभन.**—बाबूजी, कांहीं गम्मत वाटते आहे कीं नाहीं? बसा बसा तुह्मी.

**बिहारी.**—बसतोंच. आपण माझ्या पारूलच्या घरीं आलां आहांत तर माझी संभावना काय करतां? पारूलनें अखिलाला सोडून दिलें कीं काय? मला काय, सर्व सारखेंच.

लला हें ठाऊक नव्हतें. ठाकुरसाहेब गाण्यांत मोठे वस्ताद.

**पारूल.**—तर मग एक चीज गायला सांग ना?

**शोभन.**—माझें गाणें काय ऐकतां? त्यांत तुह्मांला काय समजणार? काशीच्या राजाच्या घरीं एक वेळ माझें गाणें झालें होतें. त्या ठिकाणीं, मोठमोठे गवई होते पण एका बंगाली गृहस्थाशिवाय कोणाला कांहीं समजलें नाहीं.

**बिहारी.**—तारिफ राहूं द्या; कांहीं गाना आधीं?

**शोभन.**—तंबोरा कोठें आहे?

**बिहारी.**—रिकामी बडबड नको. गायचें असेल तर गा लवकर. नाहीं तर माझा नशा उतरून जाईल.

**शोभन.**—(सूर) उंई,–या–आँ—

**बिहारी.**—क्या बात. कांहीं चीज ह्मणा. नुसते सूर नकोत.





**अखिल०**—**पारूल, पारूल**, मी धांवत धांवत आलों. तुला पाहिल्याशिवाय मला चैन पडेना. हे कोण, हिरू, हे कोण परदेशी गृहस्थ?

**बिहारी.**—तुह्मांला पाहिल्याशिवाय **पारू**लला देखील चैन पडेना ह्मणून ह्या मियासाहेबांना आणलें.

**अखिल०**—काय! **पारू**लनें बोलावलें?

**बिहारी.**—नाहीं तिच्या आतेनें.

**पारूल.**—हे माझे चोबे, मला आशीर्वाद करायला आले आहेत.

**अखिल०**—पण मी जिन्यांतून गाणें ऐकलें. **पारूल**, मी तुला मोठी चांगली समजत होतों. तूं हें काय केलेंस?

**बिहारी.**—अद्भुत कृत्य, असलें कृत्य आजपर्यंत कोणीं पाहिलें नाहीं.

होतों ना? मला वाटत होतें कीं मला प्रणयाची पुतळी मिळाली. पण तूं देखील सामान्य वारवनितेसारखीच ना? बस, बस झालें. पारूल, हीच तुझी माझी शेवटची भेट. हा मी चाललों. पुन्हां ह्या घराचा उंबरठाही चढणार नाहीं.

**पारूल.**—बाबूसाहेब, रागावतां कां? जाऊं नका, जाऊं नका.

**शोभन.**—बिबीसाहेब, तुह्मीं असें केलेंत तरी काय? जोंपर्यंत मी कलकत्त्यांत आहें तोंपर्यंत तुह्मांला बिलकुल काळजी नको. आह्मी जातीचे चोबे. पायावर डोकें ठेवून आह्मी पैसे घेतों. आह्मांला कसली पैशाची फिकीर.

**बिहारी.**—मियासाहेब, सुफल द्या, सुफल द्या, गयेंत पिंड पाडले ह्मणजे चौदा पुरुषांचा उद्धार होतो. पण ह्या गयेंत पिंड पाडले तर बावन्न पुरुषांचा उद्धार.

**पारूल.**—हे हिरूदादाचे मित्र. तो ह्यांना बरोबर घेऊन आला.





तुझी लग्नाची स्त्री नव्हे, ह्मणून तिची हेळसांड केली तरी तु-
जवरच प्रेम करील. जोंपर्यंत द्यावें तोंपर्यंत घ्यावें.

**पारूल.**—अखिलबाबू, जर तुह्मांला येथें ये-
ण्याचा खराच वीट आला असेल तर आई सांगते आहे
तसें करा. पैसे वगैरे चुकते करून टाका ह्मणजे तुमचा
मार्ग तुह्मांला खुला व माझा मला खुला. पण विचार करा,
माझ्यासारखी स्त्री दुसरीकडे कोठें मिळेल? हेंच तर तुमचें
मोठें वाईट आहे. तुमच्या घरीं एक तासभर गाणें ऐकण्या-
करितां एखादा सभ्य गृहस्थ आला ह्मणून काय झालें? यांत
इतकें रागवायला काय झालें?

**अखिल०**—पारूल! पारूल! माझें तुझ्यावर फार
प्रेम ह्मणून ना येथें येत होतों?

**बिहारी.**—पवित्र प्रणय! पवित्र प्रणय! समजला ना
पवित्र प्रणय! आपली तब्येत फारच गरम झाली आहे. ह्या

[illegible] आहेत. पहा हे सुफळ देत असतील तर.

**अखिल०**—हिरु, तूं माझा मित्र ना ? तूं असें कृत्य केलेंस !

**हिराला०**—जाऊं देत त्या गोष्टी. तुह्मीं आपला हात आंखडलात, पण मला तर दोन पैसे कसे ना कसे तरी मिळविले पाहिजेत ना ?

**शोभन.**—हिरूबाबूनें लाखांतली गोष्ट सांगितली. चल हिरू, तुला आजच जोडा विकत घेऊन देतों. आज मोठा बखेडा झाला. हिरू. ऊठ, चल लवकर. बिबीसाहेब, जातों आतां आह्मी. रात्रीं येऊं.

**हिराला०**—चला तर. आपण जिकडे जाल तिकडे मी येईन.

**शोभन.**—चल तर. एक वेळ अलीपूरचा चिडिया खाना पाहून येऊं. बंदगी बिबीसाहेब.

**पारूल.**—बंदगी. पण आठवण राहील ना ?

**अखिल०**—तूं तीच का **पारूल**?

**पारूल.**—नाहीं. नवीन बनवून आणली आहे. बसणें असेल तर बसा, नाहीं तर चालते व्हा, मी आतां निजतें.

( **वामा** व पारूल जातात. )

**बिहारी.**—हेंच तर पाहिजे. **पारूल**, तूं जर आपलें खरें स्वरूप दाखविलें नाहींस तर कसें शोभेल? **अखिल**, तुझ्या पवित्र प्रणयाची काय हवाल आहे ?

**अखिल०**—**पारूल**, गेलीस ? तूं तीच **पारूल** का? तूंच ना कवितांनीं मला मोह पाडलास. तूंच ना मला रोमान्सचें वेड लावलेंस ? तुलाच ना मी मूर्तिमंत प्रणय समजत होतों ? पण तूं तर सामान्य वेश्या! प्रणयविहार समजून आजपर्यंत मीं व्यभिचार केला! माझी प्रीति असो अगर नसो पण तुझ्याकरितां मीं विवाहित स्त्रीला लाथ मारली. तुझ्याशीं विश्वासघात होईल ह्मणून ती आसन्नमरण

प्राप्त होतो? घरीं जा, स्त्रीवर प्रेम कर, मग पहा प्रणय प्राप्त होतो का नाहीं. मीच पहा दारोदार हिंडलों, पुष्कळ शोध केला पण कुठें आढळला नाहीं. प्रणय किंवा ज्यास इंग्रजींत love ह्मणतात तो आपल्या घराशिवाय दुसरीकडे कोठेंही मिळणार नाहीं. वर डोळे लावून येथें उभें राहण्यांत काय फायदा. आतां इथें तुझाही उपाय नाहीं, व माझाही उपाय नाहीं. चल.

**अखिल०**—चल. **पारूल**, एकूण तूं असें केलेंस आँ.

**बिहारी.**—**पारूल** बिरूलच असें करणार. मग काय घरच्या स्त्रिया असें करतील? चल.

(दोघे जातात.)

---





## द्वितीयगर्भांक.

### मृत्युंजयाचा दिवाणखाना.

मृत्युंजय व आमोदिनी.

**मृत्युं०**—केवढी बुद्धि! काय कल्पना! हें बघ, तुजकरितां अमर व्हावें असें मला वाटतें. तूं मिळाल्यापासून मला कसल्याही सुखाची वाण नाहीं. दुःख काय तें फक्त अखिलाबद्दलचें. दत्तक तर घ्यायचा नाहींच. माझ्या मागें ह्या जिनगीची व्यवस्था कोण पाहील? कोण उपभोग घेईल? तूं कितीही शाहणी असलीस तरी स्त्री.

**आमो०**—प्राणनाथ, आपण जाणार कोठें! पुन्हां मजसमोर ह्या गोष्टी? आजपासून मी आपली खालच्या खोलींत निजत जाईन.

**मृत्युं०**—गोष्टीच्या ओघानें बोललों, प्रिये, त्याबद्दल रागाऊं नकोस. तूं आजन्म सवाष्ण रहा. पण हें बघ, तरूला जें सांगितलें आहे तें ती ऐकेल का?

**आमो०**—न ऐकायला काय झालें. सर्व ऐकेल. ती का कमी विनोदी आहे. हट्ट करून जर तिनें माझें बोलणें ऐकलें नाहीं, तर मी तिच्याशीं बोलणारच नाहीं.

**मृत्युं.**—तुझा तर्क बरोबर आहे. थोडें इंग्रजी शिकल्यानें अखिलचें डोकें फिरलें आहे. वेडा कानानें खातो, ह्मणजे कोणीं कांहीं सांगितलें तर तें त्याला खरें वाटतें. त्याच्या स्थितींत फरक तरी किती झाला आहे. डोळ्यांत तेज नाहीं, मनाची स्थिरता नाहीं. स्वतःला कळत नाहीं, व दुसऱ्याचें ऐकत नाहीं. जेथें खरें प्रेम मिळेल त्या ठिकाणीं औदासिन्य,

मला हाक मारा. मी आंतल्या बाजूला आहे. त्याच्याशीं माझें मोठें काम आहे.

**मृत्युं०**—ऐक, एक गोष्ट ऐकून जा.

**आमो०**—कसली गोष्ट ?

**मृत्युं०**—काय ह्मणाली होतीस तें ध्यानांत आहे का?

**आमो०**—काय ह्मणालें होतें?

**मृत्युं०**—तें, माझ्या समक्ष अखिलाला ह्मणाली होतीस तें.

**आमो०**—कोणास ठाऊक. माझ्या नाहीं ध्यानांत येत.

**मृत्युं०**—ध्यानांत येत नाहीं? अखिलाला ह्मणाली होतीस ना कीं बायकोची व तुझी प्रीति जडली ह्मणजे मी गाणें गाईन ह्मणून.

**आमो०**—पहा कशी थट्टा चालली आहे.

**मृत्युं०**—खोटें नव्हे, मग तुला गायलेंच पाहिजे.

**आमो०**—हो, हो, तेव्हां गाईनच.

**मृत्युं०**—असें हंशावारी नेऊन नाहीं चालायचें. त्या

आहेच.

( हाराण येतो ).

**हाराण.**—मल्लिक महाराज.

**मृत्युं०**—कायरे तूं असा कां दिसतोस ?

**हाराण.**—माझा घात झाला, मी मेलों, आतां वांचत नाहीं.

**मृत्युं०**—अरे मूर्खा, सहचरीचा नाद सोड, लग्न कर, तुला शपथ आहे. अकरा वर्षांची मुलगी आहे. उद्यां ठरवून टाकूं !

**हाराण.**—आतां लग्न करावयाचें ? छें, मी मेलों. सहचरी कसली खप्पड व थेरडी. काय तिचें रूप ! हिडिस कोठली. तिचें नांव काढूं नका.

**मृत्युं०**—पहा तर. समजलें का मी काय ह्मणतों तें.

**हाराण०**—समजलें नाहीं. सहचरीसारखी कुरूप जगांत कोणी नाहीं. त्या सटवीचें नांव ऐकलें कीं ओकारी

याचें वण नसतें तर तिजकडे कोणी ढुंकूनही पाहिलें नसतें.

**मृत्युं०**—तूं मोठा हतभागी. रोज रोज तुझें मन बदलतें हें काय? जी कोणी तुझ्या दृष्टीस पडते तिच्यावर आपलें तुझें मन जातें.

**हाराण.**—यापुढें मात्र दुसऱ्या कोणावर जायचें नाहीं. हीच अखेर. तिचें नांव विचारायला गेलों तों तिनें माशांच्या भांड्यांतलें दोन ओंजळी पाणी माझ्या अंगावर फेंकलेंन.

(अखिल येतो.)

**मृत्युं०**—या हो संबंधी, तुह्मी भेटलांत हेंच मोठें भाग्य!

**अखिल०**—आजोबा, मी एक गोष्ट सांगायला आलों आहें. आईला सांगितली तर ती गोंधळ करील ह्मणून तुह्मांला सांगतों.

**मृत्युं०**—तुझा चेहरा असा उदास कां? झालें तरी काय?

**अखिल०**—आजोबा, मी दूर देशीं जातों.

**हाराण.**—जा, जा, मलाही बरोबर घेऊन चल.

दोन दिवस घरीं राहून तर पहा कसें सुख होत नाहीं तें. तुझ्याकरितां ती ढळढळां रडते.

**हाराण.**—आणि ती कोळणीची पोरगी माझ्या अंगावर माशाचें पाणी टाकते. अहाहा ! बेटी मासे विकते !

**मृत्युं०**—माझ्या कपाळीं सुख नाहीं.

**हाराण.**—अखिलानें जसें सांगितलेंन तसेंच माझेंही झालें आहे. मंगळा गेली, आवडी गेली, सखू गेली, त्यानंतर सहचरीनें वेड लावलेंन. आणि हल्लीं ह्या कोळणीच्या पोरीनें.

**मृत्युं०**—अखिल, थोडा शांत हो. विचार कर. आपल्या छोट्या आजीचें ऐक, व बहिणीचें ऐक. तुझी आजी आंतल्या खोलींत बसली आहे, तिनें तुला बोलविलें आहे. तिजकडे जा व तिचें ह्मणणें ऐकून घे. मी आपलें आन्हिक आटोपून घेतों. परंतु तुझ्या कल्याणाची एक गोष्ट सांगून जातों. दत्तक घेण्याचा विचार मला पसंत नाहीं. तर माझ्या ह्यातारपणीं मला तें करणें भाग पाडूं नकोस.

## तृतीयगर्भांक.

### मृत्युंजयाच्या मागील दारचा बाग.

आमोदिनी व तरुबाला.

**आमो०**—पहा बरें, ह्या फुलांनीं तूं कशी सुंदर दिसतेस ती.

**तरु०**—खरेंच सांगूं तुला, मला मोठी लाज वाटते आहे. सासूबाईनीं व वन्संनीं पाहिलें तर काय ह्मणतील !

**आमो०**—तुझ्या सासूबाई जप करीत बसल्या आहेत व वन्सं तिसऱ्या प्रहरची पूजाअर्चा झाल्याशिवाय देवळांतून परत येणार नाहींत.

**तरु०**—नको आजी, मी सर्व फुलें काढून टाकतें.

**आमो०**—काढ तर खरी कीं मुस्कट रंगवीन. तूं सर्व

मजवर प्रीति करोत अगर न करोत—त्या राक्षसीच्या पाशांतून मुक्त झाले तर हें बघ आजी, मी काय पाहिजे तें करीन, त्यांकरतां प्राण देणें ह्मणजे काय विशाद!

**आमो०**—हाँ, हें मात्र योग्य बोललीस. अखिल येईल त्याची बातमी देण्याबद्दल मीं घरांत सांगून ठेवलें आहे. आल्याबरोबर तो मला भेटायला इकडे येईल. खबरदार जर लाजशील तर.

**तरु०**—आजी, तूं सांगशील तस्सें मी करीन. तुझ्या जवळ मला कांहींच लपवितां येत नाहीं, कारण माझ्या मनांतल्या सर्व गोष्टी तुला आपल्या आपोआपच कळतात. ह्या संसारांत मला कसल्याही सुखाची कमतरता नाहीं. आईहून-ही अधिक प्रीति करणारी अशी सासू, सख्ख्या बहिणीपेक्षां कांकणभर जास्त अशी नणंद, तुझी व आजोबांची गो-ष्टच बोलायला नको. तुमच्या उपकारांची कधींच फेड

सारखा सुखी कोणी नाही. लोकांची स्वर्गातल्या सुखाची जी कल्पना आहे त्यापेक्षांही माझें सुख जास्त आहे. पण मीं काय पातक केलें आहे कोण जाणे त्यामुळें त्या सुखांत थोडा कमीपणा आला.

**आमो०—तरू,** माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव ह्मणजे तुझें दुःख नाहींसें होईल. पतीला कोणत्या रीतीनें सुख होईल हेंच माझें ध्यानचिंतन. आणि ह्मणूनच माझ्या वृद्ध पतीला मी अगदीं जीव कीं प्राण करतें. स्वतःच्या सुखापेक्षांही तुझ्या सुखाचें मी जास्त चिंतन करतें, व विचार करून करून अखिलाचें मन कसें आहे, त्याला काय पाहिजे हें मला चांगलें समजलें आहे. त्याला किंचित् मोह पडला आहे. अज्ञानामुळें भक्ति, सेवा व आदर हीं त्याला कळत नाहींत, थोडा मोठा झाला ह्मणजे आपोआपच कळतील. सध्यां पुस्तकी प्रणयाच्या मागें लागून तो वेडा झाला आहे व





उभं राहून ती काय करते ते पाहू, वेळ आली म्हणजे तुला पुढें जावें लागेल.

**तरु०**—नाहीं नाहीं. आजी तुलाही मजबरोबर आलें पाहिजे.

**आमो०**—तूं बस्तान बिघडविणार. मीं तुला सांगितलें ना कीं तूं एकटीच थोडा वेळ बागेंत फिरत रहा. आतां चल लवकर (दोघी दडून उभ्या राहतात).

(अखिल येतो).

**अखिल०**—आजी, आजी, मला बोलावलें होतेंस? कोठें आहेस तूं? वाः, आजोबांनीं जागा तरी कशी सुंदर केली आहे! हवा कशी छान चालली आहे व ही सर्व बाग चांदणें व सुवास यांनीं भरून गेली आहे. पण ह्यांचा काय उपयोग! माझ्या शरीरांत जी आग पेटली आहे त्यावर चितेचें उदक पडल्याशिवाय ती विझणार नाहीं. व्यर्थ जन्माला आलों, चित्ताला शांति कशी ती मिळाली नाहीं. जेथें जेथें

(तरुबाला येते).

तरु०—— (तेथेंच उभी कीं आलें—या चालीवर).

लागेल कसा मम भजनीं।
मत्सख तो प्रीती करुनी ॥ हिमकरा?
ती मूर्ति मनोहर कोणीं।
नेलि तरी नकळे हरुनी ॥ हिमकरा?
पाहीन जरी मी नयनीं।
आलिंगिन रोदन करुनी ॥ हिमकरा?
संत्रास। देत हृदयास। विरह जो खास।
जाय मग सरुनी।
प्रियकरा हृदीं या धरुनी ॥ हिमकरा? ॥ १ ॥

(स्वगत) काय विचारांत आहेत कोण जाणे. माझें गाणें ऐकलें नाहींसें वाटतें. आकाशाकडे डोळे लावून उभे राहिल्यामुळें मजकडे दृष्टि वळली नाहीं. आज स्वारी कांहीं

विशेष नादांत दिसतें आहे. माझ्याच्यानें आतां धीर निघत नाहीं. मी पाय धरून विचारतें कीं आपल्या दुःखाचें कारण काय. नको पण, आजी रागवेल. तिनें जसें शिकविलें आहे तसेंच करतें. (उघड)—

(अरसिक किति हा शेला–या चालीवर).

लेइन त्या वेषाला। प्रिय जो सखया भीड कशाला ॥
नाथ कुठें मम गेला। दर्शन ज्याचें मोहि मनाला ॥
त्याविण अन्य न मजला। प्रियकर, केवल तत्पर अबला॥
कवणें चोरुनि नेला। प्रणयसुखावरी घालुनि घाला ॥ १ ॥

**अखिल०**—प्रणयाची गोष्ट! आणि येथें कोण करीत आहे. मला स्वप्न पडलें कीं काय? नाहीं. मीं चांगलें ऐकिलें. अरे, ही कोण! पुष्पालंकारांनीं भूषित ही कोण? अरे, हें काय. ही तरू कीं काय! नाहीं पण संशय नकोच. तरूच ती. तरू! काय माझी स्त्री तरू! आणि आज हा वेष व भाव! तरू, तरू, तूंच कां ही! ही मूर्ति आजपर्यंत माझ्या दृष्टीस कां पडली नाहीं! असे विचार आजपर्यंत तुझ्या तोंडून कसे मला ऐकूं आले नाहींत?

**तरु०**—(स्वगत) मी कोठें जाऊं! मला फार लाज वाटते. पण इकडून आजीची भीति वाटते. हेंच औषध चांगलें. आणखी एक वेडेपणाची लहर दाखविली पाहिजे.

**अखिल०**—तरू, तरू, तूं मजकडे पहात नाहींस का?

**तरु०**—

(फुलें वेलींचीं–या चालीवर).

गुंफिन हार। सुमनांचा सुंदर फार॥ ध्रु०॥

मानसीं ज्याच्या प्रेम वसेना साचें ।
वद कशास त्याच्या वचना मानायाचें ॥
सत्प्रेमपंजरीं बद्ध करी जो हृदया ।
नरवरा अशा मी प्रेमें वाहिन काया ॥
ज्या खरी प्रीति नच ठावी । त्यास कां
वरिवरी प्रेम बहु दावी । त्यास कां
ही तनू हाय ! अर्पावी । व्यर्थ कां
सत्प्रेम अहाहा दुर्लभ लोकीं, ज्याचें ।
सद्भाग्य त्याविणें परा न लाभायाचें ॥ १ ॥

**अखिल०**—तरू, तरू, तुला झालें आहे तरी काय? मला ओळखीत नाहींस का? मी तुझा पति. तूं माझी स्त्री. ज्याच्यामुळें तूं इतके कष्ट सोसलेस तोच हा मी तुझा पति. ज्यानें तुझ्याशीं इतकी प्रतारणा केली तोच हा मी तुझा पति.





तरु०—चंद्राचें चांदणें कसें शुभ्र पडलें आहे व फुलांचा घमघमाट तरी काय सुटला आहे आणि अशा वेळीं प्रणयानें हताश होऊन मी त्यांच्या प्राप्तीकरितां वेड्यासारखीं हिंडतें आहें ते माझे प्रियकर कोठें आहेत? अजून कां बरें येत नाहींत!

अखिल०—कोण येणार आहे, तुझा कोण प्रियकर येणार आहे? माझ्या शिवाय दुसरा कोण तुझा प्रियकर आहे!

तरु०— (या विरहा कां भीती–या चालीवर.)

प्रेम तया नच ठावें।

हृदयाची या पारख नाहीं व्यर्थ किती विनवावें ॥ ध्रु०॥
आणुनि नयनीं अश्रुजला म्यां किति देहा शिणवावें ॥१॥
हतदैवा, कां छळसी मातें दुःख किती सोसावें ॥ २ ॥

अखिल०—हें काय, हें काय! तरू, मला सोडून तूं

A4

B4

हीही रात्रंदिवस करीत असते.

**अखिल०**—आजी, **तरू**च्या हृदयांत प्रणय होता हें मला ठाऊक नव्हतें. माझ्या प्रणयाकरितां **तरू** वेडी! **तरू**, तरू, मला समजलें नाहीं. मीं तुला ओळखली नाहीं.

**तरु०**—छे, छे, तुह्मी कोण! माझ्या जवळ येऊं नका! मला स्पर्श करूं नका. तुमच्या हृदयांत प्रणय नाहीं. तुमचा चेहराही प्रणयपूर्ण नाहीं. प्रणयी मिळाल्याशिवाय हा माझा प्रेमपूर्ण प्राण मी कोणालाही अर्पण करणार नाहीं.

**अखिल०**—**तरू**, तूं लक्ष लावून पहा, मला ओळख. ज्याच्या प्राप्तीकरितां इतका वेळ मी आशाळभुतासारखा हिंडत होतों, व त्या कपटपटु राक्षसिणीच्या जाळ्यांत पडलों होतों, सुशीतल उदक समजून मृगजळावर भुललों होतों, तें अमरावतींतलें ऐश्वर्य माझ्या घरीं असून मला ओळखतां आलें नाहीं. हा केवढा माझा मूर्खपणा! आजी, माझी **तरू** कशानें

शुद्धीवर येईल तें मला सांग. एकच वेळ तिनें मला ओळखावें. फक्त एक वेळच. मग मी तिला सोडून कोठेंही जाणार नाहीं. आजी, मला दुर्भाग्याला तिची योग्यता कळली नव्हती.

**आमो०**—हें बघ तूं, तरूनें मला कांहीं सांगितलें नाहीं पण मला सर्व समजलें. ज्या दिवशीं तूं तिला लाथ मारलीस त्याच दिवशीं तिला हा रोग जडला. तेव्हांपासून तिला घेऊन जाण्याबद्दल मृत्यु व मानवी प्रयत्न यांचा सारखा झगडा चालला होता.

**अखिल०**—आजी, माझा मोठा अपराध झाला. माझे सहस्र अपराध झाले. तरू, तरू, मीं तुला फार गांजली, आतां विनंती करतों कीं तें सर्व तूं विसरून जा. माझ्यावर दया कर, मला क्षमा कर. मी प्रीतीच्या प्राप्तीकरितां हिंडहिंड हिंडलों परंतु अंध झाल्यामुळें प्रीतीचें एवढें मोठें भांडार मजजवळ असून मला दिसलें नाहीं. ( पायां पडूं पाहतो. )

**तरु०**—छे, छे, हें काय! उठा, उठा, माझ्याच कडून अपराध घडला. आपल्याला गृहवासी करण्याकरितां आजीच्या सांगण्यावरूनच हें कृत्य मीं आरंभिलें होतें. आतां माझ्याच्यानें दम निघत नाहीं. आजी, आतां माझ्याच्यानें ह्या सोंगाची बतावणी नाहीं होत. उठा, उठा, आपल्याला माहित नाहीं का, मी आपल्या पायांची दासी ती?

**आमो०**—दूर सर पोरी, अजून एक प्रवेश बाकी आहे. त्यानें तुला फार छळिली आहे तर पुन्हा मी असें करणार नाहीं असें आधीं वचन घे.

**अखिल०**—आँ, माझी तरू सुखरूप आहे! आजी, आजी, तुला काय सांगूं मला पिशाच्च लागलें होतें. प्रण-

यिनी समजून मी हडळीचा आश्रय धरला. आज मला चां-
गली शिक्षा मिळाली. दुःखानलानें होरपळून गेल्यामुळें देशत्याग करण्याचा विचार करून तुझी परवानगी घेण्याकरितां आलों होतों तों प्रणयपूर्ण अशा तरूची गांठ पडली. आतां माझा मी राहिलों नाहीं. माझें सर्वस्व काय तें तरू. मी जें धुंडीत होतों तें मला मिळालें. माझ्या ठिकाणीं इतर कांहीं दोष नाहीं. स्वस्त्रीची योग्यता मला कळली नव्हती एवढाच काय तो दोष.

**आमो०**—आतां लाजूं नकोस. नाहीं तर पहा करें करीन तें. एक वेळ वचन घेच ह्मणजे पुन्हां कधीं अशा फंदांत पडणार नाहीं.

**तरु०**—आजी, अजूनही मला कां लाजवितेस?

**आमो०**—आमच्याच पुढें सर्व लाज. आज पांच वर्षें कष्ट भोगीत होतीस त्या वेळेस मला सांगायला नाहीं लाज वाटली ती!

**अखिल०**—तरू, आजीपुढें लाजण्याची कांहीं जरूर नाहीं. पहा, मीं तुझी फार अवज्ञा केली; तूं चांगली उपदेशाची गोष्ट मला सांगण्याला आली होतीस त्या वेळीं मी तोंड फिरवून बसलों; मोठ्या प्रेमानें माझी प्रीति संपादण्याकरितां आली होतीस त्या वेळीं तुझा तिरस्कार करून झिडकारली; मोठ्या भक्तीनें माझी सेवा करावयास आली होतीस त्या वेळीं, मला काय भूत लागलें होतें कोण जाणे, तुला लाथ मारली. तूं जर तें सर्व विसरून जाशील तर मी तुला मोठी सुशीला समजेन. आजपर्यंत तुझी जी वेळोवेळीं पायमल्ली केली

त्याची जर निष्कृति होईल तर ईश्वरसाक्ष सांगतों कीं आज पासून मी तुझा दास बनून राहीन.

**तरु०**—आपण असें बोलूं नका. मला असलें बोलणें ऐकवत नाहीं. आपण माझी अवज्ञा केली त्याचें काय? मी आपली दासी. दासीला वाटेल तसें वागविण्याचा आपल्याला अधिकार आहे. त्याबद्दल इतकें वाईट वाटायला नको. इतक्या दिवसांनीं आपण मजशीं दोन गोड शब्द बोललां त्यानें मला स्वर्ग मिळाला.

**अखिल०**—तूं दासी? तूं माझी गृहलक्ष्मी, तूं माझें सर्वस्व, तूं माझ्या हृदयराज्याची राजराजेश्वरी.

**तरु०**—आजी, तूं आज मला सौख्यसागरांत बुडविलेंस. ह्या सुखातिरेकानें मला वेड लागेल कीं काय अशी भीति पडली आहे. माझा आनंद हृदयांत मावत नाहीं.

**अखिल०**—(चकित होऊन) अरे हे पहा आजोबा आले!

(**मृत्युंजय येतो.**)

**मृत्युं०**—तुझ्या आजीला ओळखलीस का? मी आपला असा साधा मनुष्य, मला पहा कसें तिनें मारून टाकिलें आहे, व तुलाही अडकविण्याकरितां कसें जाळें पसरलें होतें तेंही मीं आडून पाहिलें. तूं नाक घांसून तिची क्षमा माग. मुली, तूं कां घोंगट घेऊन उभी? आमच्याच समोर सर्व लाज! (बायकोस) कायगे, दाखवूं का आतांच? तुझें काय ह्मणणें आहे? ज्याकरितां आजपर्यंत हें गुप्त ठेवलें होतें त्याचें आतां कारण उरलें नाहीं. ए पोरा, वाच हा कागद.

**अखिल०**—(कागद वाचून) आजोबा—हें काय—हें! तुम्ही आपली सर्व मालमत्ता मला दिली?

**मृत्युं०**—गप्प बैस, पोरा, पहा ग, हा पोरगा काय खोटें बोलतो आहे! ह्याला देईन मी आपली मालमत्ता? तरू ह्मणजे माझी कोणीच नाहीं वाटतें! सावध रहा ह्मणून मी तुला नेहमीं सांगत होतों तसेंच दत्तक पुत्र घेणार नाहीं, हेंही कळविलें होतें तें सर्व याचकरितां. समजलास?

**अखिल०**—तरू आणि मी वेगळा आहें कीं काय? तुह्मी माझें नांव न लिहितां सर्व तरूच्याच नांवावर करून द्या. माझी कांहीं त्याला हरकत नाहीं.

**मृत्युं०**—तुझ्या आजीच्या प्रयत्नानें माझ्या आनंदाला सीमा उरली नाहीं. तुझें असें बहकलेलें वर्तन पाहून मला मोठें दुःख होई; तें आतां उरलें नाहीं. आज मी आनंद-सागरांत बुडालों. तुझ्या बापाला मीं लहानाचा मोठा केला. माझें जें कांहीं आहे तें तुला द्यायचें नाहीं तर द्यायचें तरी कोणाला? बाहेरचें एखादें पोर धुंडून आणून त्याला दत्तक घेणें मला बिलकुल पसंत नाहीं. तुझे डोळे भरून कां आले? हें काय? इकडे येऊन मला नमस्कार कर. ही पोरगी पहा अजून लाजत लाजत दूरच उभी. तुह्मी दोघेजण बरोबर नमस्कार करा. (नमस्कार करितात.) पुरे झालें. आतां आशीर्वाद देतों. जसें आह्मी दोघें ह्मातारा ह्मातारी—छे, छे, चुकलों चुकलों, नव्हे नव्हे—ह्मातारा व तरुणी जसें एकदिलानें सुखी आहोंत, तसें तुह्मी दोघेजण शतायू होऊन आनंदानें काल-क्रमण करा. ऐकलेंस का ए, आतां करार पुरा केला पाहिजे.

**आमो०**— मी नाहीं जा. ह्यांची थट्टा पहा!

**अखिल०**—काय आहे हें आजोबा!

**मृत्युं०**—तूं इतकें शिकला सवरलास कशाला? तुला अशी विस्मृति कशी पडली? तुला सांगितलें नव्हतें, कीं ज्या दिवशीं तुझी व तरूची प्रीति जमेल त्या दिवशीं मी गाणें गाईन ह्मणून?

**अखिल०**—हो हो, आजी तर मग आतां करार पुरा कर.

**आमो०**—एकूण तूंही माझ्या मागें लागलास, बरें तर.

(प्रिये पहा रात्रीचा० या चालीवर.)

पहा कसा विरहतमा दूर करुनि प्रेमतरणि उगवला ॥धु०॥

नयनाशीं नयन जुळे
मोदभरें वदन खुले
प्राणाशीं प्राण मिळे
प्रणय ये फला ॥ १ ॥



देहाचा विसर पडे
प्रेमसरीं हृदय बुडे
भरती ये लाट चढे
प्रीतिसिंधुला ॥ २ ॥

---

**पंचम अंक समाप्त.**

